# संगीत विद्याहरण.



कचः—छेडिसी मज कुसुमशुमार, लाजि तांचि मज फिरवी! [ पृष्ठ ६०.

# संगीत विद्याहरण.

हें नाटक

## रा० रा० कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर,

संगीत ‘ स्वयंवर, ’ संगीत मानापमान, ’ ‘ सत्त्वपरीक्षा ’
‘ प्रेमध्वज, ’ ‘ भाऊबंदकी, ’ ‘ बायकांचें बंड ’ ‘ कीचकवध, ’
‘ सवाई माधवराव यांचा मृत्यु, ’ ‘ कांचनगडची मोहना, ’
इत्यादि नाटकांचे कर्ते, यांनीं लिहिलें

तें

रा० रा० शंकर नरहर जोशी, यांनीं पुणें येथें ‘ चित्रशाळा ’
छापखान्यांत ( ८१८ सदाशिवपेठ–पुणें शहर ) छापून प्रसिद्ध केलें.

---

( आवृत्ति पहिली. )

---

सन १९१३

किंमत बारा आणे.

# प्रस्तावना.



महाभारतांतील ' कच-देवयानी ' आख्यानांत शिष्टसंमत फेरफार करून हें नाटक लिहिलें आहे. शुक्राचार्यांना स्वतःचे शिष्यवृंदाबद्दल व सांप्रदायाबद्दल अपत्यस्नेहाचे तोडीचा अभिमान वाटत होता, आणि त्यांचा शिष्यवृंद स्वहिताविषयीं नेहमीं दक्ष होता; अशा अभिमानाच्या व दक्षतेच्या तटबंदींत कोंडून ठेवलेली संजीवनी विद्या देवांच्या बाजूला कशी गेली ? या विद्येचें हरण करितांना कचाचे कार्यनिष्ठेला देवयानीच्या दिव्यप्रेमाची मदत मिळाली, दैत्यांच्या फाजील दक्षतेंतील अविचाराचा पाठिंबा मिळाला; व आचार्यांच्या सुरापानाचे व्यसनामुळें तटबंदीचे दरवाजे खुले झाले. ' विद्याहरणा 'ची ही कथा नीट समजण्याकरतां व त्यांतील रसाचा परिपाक होण्याकरितां सांखळींतील निरनिराळ्या दुव्यांना योग्य वळण द्यावें लागलें. शिवाय मद्यपानाबद्दल तिटकारा उत्पन्न करून मद्यपाननिषेधाच्या विषयाची नाट्यदृष्टीनें पूर्तता व्हावी म्हणून मद्याधीन ' शिष्यवरा 'चे हास्यरसाची जोड पौराणिक पात्रांना द्यावी लागली.

' मानापमान ' नाटकाप्रमाणें ह्याही नाटकांत गायकी चालींचाच उपयोग केला आहे. ह्या चाली प्रि० भास्करराव बखले आणि ' गंधर्व नाटक मंडळी' चे मालक रा. नारायण श्रीपाद राजहंस उर्फ बालगंधर्व, रा. गोविंदराव टेंबे व रा. गणपतराव बोडस यांजकडून मुख्यतः घेतल्या असून, रा. टेंबे यांनीं केलेलें पदांचें नोटेशन; वाचकांचे सोईसाठीं, स्वतंत्र पुस्तकाचे रूपानें प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे. चालीसंबंधानें केलेल्या मदतीबद्दल प्रि० बखले, रा. बालगंधर्व, रा. टेंबे, व रा. बोडस, यांचा मी फार अभारी आहें, या पुस्तकांत घातलेलीं चित्रें अभिनयकुशल गंधर्व नाटक मंडळीच्या त्या त्या भूमिकांच्या फोटोवरून तयार केलीं आहेत. हे फोटो दिल्याबद्दल ' गंधर्व-नाटक मंडळी ' चे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत.

पुणें, गुरुवार ता. २०<br>नोव्हेंबर १९१३      ग्रंथकर्ता.

# संगीत विद्याहरण नाटक.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ स्थळ—बाग. मयूरासनावर सरस्वतीप्रमाणें सजून वीणा घेऊन देवयानी बसली आहे; शर्मिष्ठा, गायत्री व इतर मैत्रिणी मिळून सरस्वती-पूजन करीत आहेत; सरस्वतीचे शेजारीं मोर नाचत आहेत; असा देखावा. ]

**गायत्री, शर्मिष्ठा व इतर मैत्रिणीः—**

पद १. राग यमन, ताल त्रिवट.

[ " दिर दिर ते नारे तन नारे तदारे दानी, " या चालीवर. ]

सुखकर हें होवो मज वाग्वधुवंदन ।
नाट्यनर्तनीं काव्य-मयूरा या देखोनी,
कविमन, मधुसम गानीं, गुंगवी नादनंदनी,
कंठनृत्य नाचोनि, सरस्वती देई
प्रतिभेसि बहुचलन. हें होवो मज ॥ ध्रु० ॥
भासे व्योम गायनधाम, कणकण नटलें नादब्रह्म,

गातां बाला; वीणाकांत रमला;
एकजीव मग तो होत, रव न तयाचा कानीं येत,
बोले त्याला—" मूका कैंवि झाला,
देत प्रेम सवतीला."—कठोर या बोला
झेली कविजन. सुखकर हें होवो मज ॥ १ ॥

गाय०:—शर्मिष्ठे, हें ग काय ? ही देवयानी आमच्या बरोबर चांगली आनंदानें गात होती, आणि एकाएकीं भृकुटी चढवून हातांतल्या वीण्याकडे अशी रागावल्यासारखी पाहूं लागली !

शर्मि०:—होय गडे, ही त्या वीण्यावर खरीच रुसलेली दिसते !

गाय०:—अग देवयानी, इतकें कांहीं रागावयाला नको हो !

शर्मि०:—अग गाण्यांतली सरस्वती वीण्यावर रागावली आहे.

मैत्रि०:—गाण्यांतली हो गाण्यांतली !

गाय०:—इश्श ! या सरस्वतीपूजनांत थोडा वेळ हिला सरस्वती करून बसविलें, तर गाण्यांतल्या वर्णनाप्रमाणें ही आपली खरोखरच रुसून फुगून बसली !—पाहिलेंस का शर्मिष्ठे, आम्ही इतक्या बोलतों आहों, पण जरा तरी आमच्याकडे हिचें लक्ष ! मला वाटतें सरस्वती हिच्या अंगांत संचारली आहे !

पहि०:—हो हो ! खरेंच संचारली आहे !

दुस०:—अगदीं भृकुटींत संचारली आहे !

तिस०:—सरस्वतीच ग गडे, सरस्वतीच संचारली आहे ! अल्लड तरुणीप्रमाणें भृकुटी आतां मुरडली जात नसून, कुशलतेनें आणि निश्चयानें भृकुटीचें धनुष्य वांकविण्यांत आलें आहे !

मैत्रि०:—आतां देवयानी शहाणी सरस्वती झाली !

शर्मि०:—अग हें सगळें ढोंग आहे !—हो सगळें ढोंग आहे.—मी सांगूं का ही कां रुसली आहे ती ?—मीं सांगितलें म्हणजे कशी खुदकन हंसेल !—हं चढीव, लागेल तितक्या भिंवया चढीव !—हंसवूं का मी हिला ?

गाय०:—हें ग काय देवयानी ? अशी घुमी कां तूं ? आमच्या ह्या समारंभावर असें हें दुःखाचें छत तूं पसरणार वाटतें !—हिच्या या रागावलेल्या चेहऱ्याकडे पाहिलें म्हणजे मला बाई भयच वाटतें !—अग देवयानी, अशा आनंदोत्सवांत थट्टेनेंही एकसारखें रागावून बसणें चांगलें नव्हे हो. रागावण्यासारखें दुश्चिन्ह दुसरें कोणतेंही नाहीं.

शर्मि०:—आतां मी हिचा राग घालवितें.—गायत्री, तुझ्या ध्यानांत नाहीं का हें आलें ? अग, या पूजेंत नैवेद्य फळफळावळीचा दाखविला; अग दारूचा पेला पुढें ठेवावयाला पाहिजे होता !

मैत्रि०:—हो ! हो ! दारूचाच पेला पुढें ठेवावयाला पाहिजे होता !

शर्मि०:—म्हणून ही रागावली आहे. होय ना देवयानी ? सरस्वतीला नैवेद्य दारूचा पाहिजे. सरस्वतीचा प्रसाद म्हणून काय ती आम्हीं बायकांनीं दारू घ्यायची ! पुरुषांप्रमाणें सदासर्वदां दारू घ्यायला आम्हांला कुठें आहे मोकळीक ? मग आजची ही संधि वायां गेलेली पाहून देवयानीला कां राग येणार नाहीं ! हो, असेंच. जा ग, दारूचे पेले घेऊन या. ( मैत्रिणी जातात. ) आतां पहा गालांतल्या गालांत आपोआप हंसूं लागेल !—तें पहा त्यांनीं मद्य आणलेंच !—गालावरचे गुलाब रागानें होरपळले आहेत ना ! आतां आनंदानें हंसूं लागतील.

[ दारूचे पेले घेऊन मुली नाचत येतात. ]

मुली:— . . . . . . . .

पद २. राग भूप, ताल दादरा.

[ " छांडो छांडो जी मोरि कलैय्या " या चालीवर. ]

प्याहो प्याहो सुरा ही सुगंधा ।
सुरेशा जिंकाया सुरासेवन वंदा ।
ही सुरा रणीं देत कंदनीं आनंदा ॥ ध्रु० ॥
शक्ति हीच दैत्यहातिं, सुरगण तिज सहज भीति,
सुरापान अमरमरण दानवजीवनसाधन;
मी धरि या छंदा ॥ २ ॥

शर्मि०:—( नैवेद्य दाखवून ) हे देवी, ही मदिरा प्राशन करून आम्हांवर प्रसन्न हो, आणि माझ्या बाबांच्या नगरींत नांदणारी संजीविनी विद्या अमरपुरींत कधींही जाणार नाहीं, असा आम्हांला आशीर्वाद दे.—हं, ही अजून गप्पच !—हें ग काय देवयानी ? उचलना पेला तो !—अग ही अधिकच रागावल्यासारखी दिसते !

गाय०:—हो, अधिकच रागावली !—हं ! बरोबर आहे. आतां मला आठवलें; शर्मिष्ठे, हिनें म्हणे अलीकडे दारू सोडली आहे. मला परवां म्हणत होती, मी आतां यापुढें दारूच्या पेल्याला हातही लावावयाची नाहीं म्हणून. मला बाई वाटलें तें सगळें बोलणें थट्टेचें. पण हिनें खरीच दारू सोडलेली दिसते हं !

शर्मि०:—हात लावावयाची नाहीं, इतकेंच ना ?—मीच लावतें दारूचा पेला तिच्या ओठाला.

[ दारूचा पेला देवयानीच्या ओंठाजवळ नेते; देवयानी पेला झिडकारून मयूरासनावरून खालीं उभी राहते; शर्मिष्ठा पेला पुन्हा पुढें करिते. ]

देव०:—( शर्मिष्ठेचा हात झिडकारून ) हें ग काय शर्मिष्ठे ? तुला आतां गायत्रीनें सांगितलेंना मीं दारू सोडली म्हणून ! मग पुन्हा पुन्हा तो पेला कशाला माझ्यापुढें नाचवितेस ?

शर्मि०:—तूं जर दारू खरीच सोडली असलीस तर यापुढें सोड. आज तुला थोडी तरी घेतलीच पाहिजे.—आमच्या सरस्वतीपूजेला अपशकून होतो ना ?

देव०:—झाला तर झाला अपशकून. कांहीं केल्या मी घ्यायची नाहीं.—मीं जर तुमच्या भिडेनें थोडीशी घेतली आणि हें त्यांना समजलें—

शर्मि०:—त्यांना म्हणजे कोणाला ग ?

देव०:—कोणाला म्हणजे ? दारू पिऊं नको म्हणून ज्यांनीं मला उपदेश केला त्यांना.

शर्मि०:—अग आमच्या या मद्यदेशांत, माझ्या बाबांच्या या मदिरापुरींत, माझ्या भावाच्या या मधुवनांत, शुक्राचार्यांच्या ह्या विद्यासवमंदिरांत, दारू न पिण्याचा उपदेश करणारा एवढा मोठा मेला तो धाडसी कोण ?

देव०:—कचदेवाशिवाय दुसरा कोण एवढा धाडसी असणार ?

पद ३. राग सिंदुरा ताल दीपचंदी.

[ " कान्हा ये सखि नंद महलमे " या चालीवर. ]

आला जो मज प्रेमें वराया ।
कां न करी सुशिला निज जाया ॥ ध्रु० ॥

कुमुदमोहें पंकांत दिसला।
करि मग विमल, शशि तो कमला ॥ १ ॥

तुम्हां सगळ्याजणींना मी आतां निक्षून सांगतें, कचदेवांना आवडणार नाहीं, असें मी कांहीं करणार नाहीं.

[ शुक्राचार्य, व वृषपर्वा छत्रासह; युवराज, सेनापति, शिष्यवर, व मधुकर, वगैरे प्रवेश करितात. ]

युव०:—बाबा, हेंच तें; आचार्य, मी म्हणत होतों तेंच हें.

वृष०:—गुरुमहाराज, देवयानीचें आतांचें बोलणें आपण ऐकलें आहे; युवराज व सेनापति यांनीं सांगितलेली बातमी खोटी नाहीं, असें आपणांस वाटत नाहीं काय ?

युव०:—गुरुमहाराजांना मीं यापूर्वीं कितीदां विनंति केली आहे कीं गुरुकन्येचें मन कचदेवावर बसलें असून कचदेव कांहीं केल्या मद्यप्राशनाची दीक्षा घेऊन या पायांच्या खऱ्याखुऱ्या सांप्रदायांत सामील व्हावयाचा नाहीं.

सेना०:—याकरितां आम्हां सर्व सैनिकांची अशी विनंति आहे कीं, आचार्यांच्या सांप्रदायाचें अभीष्ट व्हावें म्हणून शिष्यवरांशीं गुरुकन्येचें लग्न लवकर तरी करावें, किंवा—

वृष०:—कचाला विद्यासव-मंदिरांतून हांकून तरी द्यावें. देवयानीच्या प्रेमामुळें गुरुमहाराजांचा जामात जर कच झाला तर गुरुकन्येबरोबर संजीवनी विद्या व हे चरण आम्हां दीनांना अंतरून, अमर-प्रदेशावर इतकेंच नव्हे, तर पृथ्वीतलावरही आम्ही होतों का नव्हतों असे होऊन जाऊं.

युव०:—गुरुमहाराजांना जर शंका असेल तर देवयानीलाच विचारावें.—सांग, शर्मिष्ठे, सांग; गुरुदेवतेपुढें खरें खरें सांग. या देवतेच्या

सांप्रदायाची निंदा देवयानीपाशीं कच करीत असतो व तीही त्याच्या म्हणण्याला माना तुकवीत असते, हें खरें आहे ना ?

शर्मि०:—होय दादा, अगदीं खरें आहे.—गुरुमहाराज, हा प्रसाद मीं दोनदां हिच्यापुढें केला, पण हिनें माझा हातच झिडकारून दिला !

शुक्रा०:—काय ग देवयानी ? दारू न पिण्याचे हे ढंग तुला कोणीं शिकविले ?—बोल, कोणीं शिकविले ?

देव०:—कचदेवांनीं, बाबा.

शुक्रा०:—आणि तें तूं निमूटपणें ऐकून घेतलेंस ?

देव०:—बाबा, तसा उपदेश करितांना ते असें कांहीं गोड बोलतात,—आपण जर त्यांचें बोलणें ऐकलें असतें तर मला वाटतें—

शुक्रा०:—काय वाटतें तुला ?

देव०:—आपणालादेखील दारू पिऊं नयेसें वाटलें असतें.

शुक्रा०:—मला दारू पिऊं नयेसें वाटलें असतें ? जसें कांहीं तें पापच आहे !—देवयानी, कचानें तुला भलताच उपदेश केला. माझ्या सांप्रदायाइतकें सुख दुसरीकडे कोठेंही मिळावयाचें नाहीं.—स्वतःच्या कृतीच्या, स्वतःच्या मताच्या, व स्वतःच्या वस्तूच्या उपभोगाचे आनंदांत मन गर्क झालें असतां जो उन्माद उत्पन्न होतो, त्याच्या इतकी आवडती स्थिति दुसरी कोणचीही नाहीं. ह्या उन्मादाचा आस्वाद घेतल्यानंतरच शरीराला निद्रा मिळते, मन शांत होतें, व बुद्धि स्थिरता पावते. ह्या उन्मादाच्या लालुचीनें ब्रह्मदेवानें सृष्टि निर्माण केली, शंकरानें घोर तपश्चर्या आरंभिली, व विष्णूनें क्षीरसागरांत शयन केलें. ह्या उन्मादामुळें देवेंद्र व वृषपर्वा यांच्यामध्यें युद्ध सुरू झालें; ह्या उन्मादाला भुलून या

शुक्रानें संजीवनीच्या प्राप्तीसाठीं कल्पनातीत हाल सोसले; आणि मुली, ह्याच उन्माद स्वकीयांना सुलभ व्हावा म्हणून कच आज शत्रूच्या मंदिरांत विद्या शिकावयाला आला. देवयानी, महत्त्वाकांक्षी पुरुषांना जो उन्माद अपूर्व पराक्रमानें मिळवावा लागतो, खडतर शरीरदंडानें जो उन्माद योगी साध्य करून घेतात, व ज्या उन्मादाचा प्रवाह एकसारखा वाहत रहावा म्हणून ब्रह्मादिकांना अखंड तपश्चर्या करावी लागत आहे, तोच उन्माद गोरगरिबांना, लंगड्यापांगळ्यांना, व बुद्धिहीनांनाही दारूच्या एका पेल्या-सरशी प्राप्त होतो.

पद ४. राग मांड, ताल धुमाळी.

[ " उधो सुसरत हम देखी " या चालीवर. ]

गमे देहसुखसीमा ही,
तळमळे जगीं जें मन चंचल, येथचि अचल
कसें होई ! ॥ ध्रु० ॥
जिंकुनियां जग, आचरुनी तपा,
तृप्ति-शांति नाहीं ।
शुक्र दुःख सेवी जो, सुख तो मदिरासंगें पाही ॥१॥

देव०:—मी तरी काय करूं बाबा ? त्यांचा उपदेश माझ्या मनाला पटतो आणि—

शुक्रा०:—देवयानी, मी एकवेळ संजीवनी विद्या दुसऱ्याला शिकवीन, पण मद्यप्राशन कधींही सोडणार नाहीं; हें तुला पक्कें माहीत असतांना माझ्यापुढें त्या कचाच्या उपदेशाची प्रतिष्ठा सांगतेस काय ?

देव०:—मी तरी काय करूं बाबा ? ते रागावतील असें कांहींही करूं नयेसेंच मला वाटतें; मी तरी काय करूं ?

युव०:—महाराज हेंच तें; आम्ही म्हणत होतों तेंच हें. कचाला येथें राहूं दिलें, हीच पहिली मोठी चूक झाली.

वृष०:—महाराज, प्रेमाचें बीज गुरुकन्येच्या मनांत रुजून त्याला आतां अंकुर फुटला आहे; वेळींच सावध होऊन या बीजाचें कारण जर समूळ येथून हांकून दिलें नाहीं, तर देवयानीचीं जीं प्रत्युत्तरें आज विनयाचीं व गरिबीचीं दिसत आहेत, तींच उद्यां—

शुक्रा०:—निर्लज्जपणाच्या धिटाईचीं होतील,असेंच ना आपलें म्हणणें ?

वृष०:—गुरुदेवतेला सर्व कांहीं समजत आहे; पण त्या कचाला पाहिलें कीं, तो आमच्या मुळावरच जन्मास आला आहेसें मला वाटतें.

शुक्रा०:—राजाधिराज, आपली भीति निराधार आहे.—आपलें वैभव कायमचें टिकावें म्हणून माझ्या सांप्रदायाचे अभिमान्याशिवाय इतर कोणालाही मी माझी मुलगी देवयानी व माझी विद्या संजीवनी देणार नाहीं; हें पूर्वींच जाहीर केलें नाहीं काय ? आमच्या सांप्रदायाचा उपहास करणाऱ्यांचा अग्रणी कच असून त्यावरच देवयानीचें प्रेम वसलें आहे, हें पाहून आपलें मन उद्विग्न व्हावें, हें साहजिकच आहे. ही काळजी दूर करण्याकरितां, युवराज, मी आपणांला सांगून ठेवतों—

पद ५. राग शंकरा, ताल झपताल.

[ “ निर्धना जी वरी ” या चालीवर. ]

जाण जरि शत्रुला, जामात नेमिला ।
वंशतरु जाळिला, मींच माझा ।। ध्रु० ।।
देवयानी मला, पुत्र जणुं एकला ।
काव्यरस जन्मला, गीतराजा ।। १ ।।

अभिमान हा दिसे, तापसाला पिसें ।
जीव परि तो असे, आप्तकाजा ॥ २ ॥

देवयानी, ज्या आदिशक्तीच्या कृपेनें एक तप उग्र तपश्चर्या करण्याचें सामर्थ्य माझ्या या शरीरांत उत्पन्न झालें, व ज्या ज्ञानेशाच्या प्रसादानें मला संजीवनी विद्या प्राप्त झाली, त्या मातापितरांच्या—पार्वतीपरमेश्वराच्या—चरणांची शपथ घेऊन—

देव०:—बाबा, शपथ कशाला घेतां ?

शुक्रा०:—हो, देवयानी, त्या पार्वतीपरमेश्वराच्या पायांची शपथ घेऊन मी आज पुन्हा प्रतिज्ञा करितों, माझ्या सांप्रदायाची दीक्षा न घेणाराला मी अधिराजांचा वैरी समजेन, आणि—

देव०:—नका, प्रतिज्ञा करूं नका.

शुक्रा०:—होय, मी आज पुन्हा प्रतिज्ञा करितों माझ्या सांप्रदायाची दीक्षा न घेणाराला मी अधिराजांचा वैरी समजेन, आणि अधिराजांच्या वैऱ्याला मी माझी मुलगी व माझी विद्या कधींही देणार नाहीं.

वृष व युव०:—आचार्यांच्या चरणरजाचे दासांवर गुरुदेवतेचा हा अनुग्रहच झाला. [ पायां पडतात. ]

शुक्रा०:—( त्यांचे मस्तकांवर हात ठेवून ) पार्वतीपरमेश्वर तुमचें कल्याण करो.

वृष० व युव०:—( उठून ) हेच चरण आम्हांला पार्वतीपरमेश्वर.

सेना०:—आतां आमची काळजी दूर झाली.

पद ६. राग मुलतानी, ताल एका.

[ " गोविंदसो प्रीत कीनि " या चालीवर. ]

बोल नसे, मूर्ति हीच सलली सुरनयनीं ॥ ध्रु० ॥
विजयि होत दैत्य सदा हे हो पद नमुनी ॥ १ ॥

शिष्य०:—आतां कसलीही भीति उरली नाहीं.—भयनाशाचा आजचा हा सुखकर प्रसंग मदिराप्राशनानें, सरकार, साजरा केला पाहिजे.

मधु०:—अगदीं बरोबर, अगदीं असेंच. आतां दारू प्यायला सुरुवात करावी.—गुरुदेवतेला सरकारांनींच नैवेद्य दाखवावा.

शुक्रा०:—शर्मिष्ठे, तुमच्या सरस्वतीपूजनाच्या व्रताचा भंग देवयानीनें दारू न पिऊन आतां केला, हें कांहीं सुचिन्ह नव्हे. या अपशकुनाचें प्रायश्चित्त म्हणून सरस्वतीच्या आसनावर मी स्वत: बसून तुमच्या नैवेद्याचा स्वीकार करितों. (मयूरासनावर बसतो.) आणा, तुमचा नैवेद्य आणा; आणि आपल्या व्रताची सांगता करून घ्या.

[ पेले घेऊन मुली येतात. ]

शर्मिष्ठा:—

पद ७. राग जिल्हा, ताल खेंमटा.

[ " मै तो सैयाकि प्यारि दुलारी " या चालीवर ]

जनसंताप सारा हराया नटे मद्यकाया, ही राया ।
सकल मज जग, परमसुखपद, ज्ञानमधुमद, काव्यरसनद,
हीच, बहु धन, धन्य तनमन, पंचप्राण,
गणगोत सोयरा ॥ ध्रु० ॥

वीरमाता, वीरकांता, रणदुहिता, ही जाण ।
धेय जाणा ही ज्ञाना; तोडि रिपुची मान
तपा ही जोड, गमे बिनतोड; करूनि कटु गोड
पुरविते कोड महामाया ॥ १ ॥

[ सर्वांच्या पुढें पेले ठेवतात. ]

शुक्रा०:—अधिराज, हें सरस्वतीपूजन नसून माझ्या अंगांत संचार करींत असलेल्या संजीवनीविद्येचें हें पूजन आहे; तुम्हीं सर्वांनीं संजीवनीचा हा प्रसाद आतां प्राशन करावा. ( देवयानीशिवाय सर्व घेतात. ) देवयानी, तूंही हा प्रसाद घेतला पाहिजे. युवराज, शर्मिष्ठे, तुम्हीं सर्वांनीं हा प्रसाद घेतला पाहिजे.

शिष्य०:—गुरुदेवतेच्या अनुग्रहाशिवाय असला दिव्य प्रसाद कोठला चाखायला मिळायचा !—फुकट, कचाचा जन्म फुकट !—गुरुमहाराज, युवराजांच्या कृपेनें या पायांचें दर्शन मला ज्या वेळीं झालें, त्या वेळीं डोळ्यांचें सार्थक्य होऊन वडिलांच्या ऋणांतून मी मुक्त झालों; कारण शरीराला डोळे बापाप्रमाणें असतात.—आचार्य, माझ्या जिभेनें रोज खाऊं पिऊं घालून मला लहानाचा मोठा केला; तेव्हां जीभ माझी आई होय, आणि असला प्रसाद ज्या वेळीं मला मिळतो त्या वेळीं मी मातेच्या ऋणांतून मुक्त होतों. आतां स्वतःचें ऋण राहिलें.

सेना०:—देवयानीशीं विवाह झाल्यानंतर हे शिष्यवर स्वतःचे ऋणांतून मुक्त होऊन जीवनमुक्त होतील.—

मधु०:—अगदीं बरोबर; अगदीं जीवन्मुक्त होतील;—( पिऊन ) आणि महाराज,—संपलें यांतलें मद्य. कुडींतला प्राण निघून गेला तरी

आपल्या नवऱ्याचे शवाला पतिव्रता ज्याप्रमाणें कवटाळीत असते त्याप्रमाणें या पेल्यांतला शेवटला थेंब नाहींसा झाला तरी या मधुकराची जीभ हा पेला ( चाटून ) कुरवाळीत आहे; संजीवनी विद्येच्या समोर असतांना माझ्या जिभेला अक्षय सौभाग्य मिळालें पाहिजे, आचार्य !

शुक्रा०:—मी हजर असतांना या मधुकराचा पेला रिकामा होतां कामा नये.

शिष्य०:—आम्हां दोघांचाही केव्हांच रिकामा झाला आहे.

शर्मि०:—जा ग, आणखी पेले भरून आणा. या दोघांना मनमुराद दारू पिऊं द्या. [ दासी जाऊं लागतात.]

शिष्य०:—तेथून कशाला आणायला पाहिजे ? तोंपर्यंतचा काळ फुकट नाहीं का जावयाचा ? काळ फुकट दवडणें हें मूर्खांचें लक्षण आहे.

मधु०:—अगदीं बरोबर; अगदीं असेंच. तो गुरुकन्येचा पेला तसाच आहे, त्यांतला प्रसाद आम्हां दोघांना निम्मा निम्मा वाढा, आणि मग तेथून मोठें भांडें भरून आणा.

[ दासी देवयानीचा पेला घेऊं लागते. ]

शर्मि०:—हें ग काय ? हिचा काय म्हणून ? देवयानी, हा संजीवनीचा प्रसाद आहे; तुला घेतलाच पाहिजे.

देव०:—त्यांचे पेले रिकामे झाले आहेत, त्यांच्या पेल्यांत हा प्रसाद ओत जा.

शर्मि०:—जा ग, त्या तेथून थोरली सुरई भरून आण. ( दासी जाते. ) आचार्य, केव्हांचा तसाच पेला हातांत घेऊन ही उभी आहे ! संजीवनीविद्येचाही प्रसाद न घेणें म्हणजे काय ?

देव०:—दारू पिणें मला आवडत नसलें तर ?

शुक्रा०:—नाहीं बाळे; तुला तो प्रसाद घेतलाच पाहिजे.—हं, आटप, घे; एक घोटभर घे; एक थेंब ओठाला लाव; तुझ्या जिभेवर त्याचें नुसतें मार्जन तरी कर.

देव०:—बाबा, कचदेवांना काय वाटेल ?

शुक्रा०:—आणि मला काय वाटेल याचा विचार तुझ्या मनाला शिवत देखील नाहीं हं !

वृष०:—आचार्य, विनंति करण्याचें धाडस करितों, या कसूरीची माफी असावी.

शुक्रा०:—अधिराज, काय इच्छा आहे ?

वृष०:—मदिराप्राशन न करण्याऱ्या आमच्या वैऱ्याला गुरुकन्या व संजीवनी विद्या द्यावयाची नाहीं, अशी आचार्यांनीं प्रतिज्ञा केलीच आहे; पण गुरुकन्येचें आतांचें उत्तर ऐकून मला भीति वाटते, कचाला आजचे आज बाहेर घालवून दिलें नाहीं तर आतांची प्रतिज्ञा शेवटास नेणें आचार्यांनाही मुष्किलीचें होईल.

युव०:—गुरुदेवतेपाशीं माझीही अशीच विनंति आहे, कचाला आजचे आज हांकून लावावा; एरवीं गुरुदेवतेच्याही सदुपदेशाचा योग्य परिणाम देवयानीवर होणार नाहीं.

शुक्रा०:—देवयानी, तुला पित्याच्या आज्ञेपेक्षां कचाचा उपदेश अधिक प्रिय वाटतो काय ?—बोल, मुली, बोल. माझ्या आज्ञेप्रमाणें तूं वागणार का कचाचा शब्द झेलीत राहणार ?

देव०:—आपल्या पित्याची आज्ञा मोडणारी देवयानी कचदेवांना तरी कशी आवडती होईल ? पण बाबा, कचदेव ज्या वेळीं प्रथम आपल्या मंदिरांत आले, त्या वेळीं त्यांच्यावर ममता करावयाला आपणच मला सांगितलेंना ?—प्रेम करावयाचें आणि त्यांचेंच मन दुखवावयाचें, हें कसें होईल ? प्रेम अंधळें असतें, आणि आंधळ्याला नाकासमोर एकाच दिशेनें जातां येतें.

पद ८. राग पिलू ताल त्रिवट.

[ " निर्मली गातकि चित चढी कामिन " या चालीवर. ]

स्त्रीजना विषय सकलहि एकचि
अचल प्रेम; मन इतर ना घेई ॥ ध्रु० ॥
जणु निज राजयोग शिकवित गुरु
सरल मार्गीचि मोक्षा जाई ॥ १ ॥
प्रबल महाजन पतित जीवहिं
मिळत येथ; न कुणासि मनाई ॥ २ ॥

म्हणून मी म्हणतें बाबा, कचदेवावर प्रेम करीत जा अशी आज्ञा ज्या वेळीं आपण मला केली, त्या वेळीं त्यांचा उपदेश ऐकत जा अशीच आपली आज्ञा मला नाहीं का झाली ?

शुक्रा०:—अधिराज, कचावर प्रेम करायला मींच देवयानीला सांगितलें, हें खरें आहे; पण देवयानी, प्रेमाच्या वेसणीमुळें तूं कचाचे ताब्यांत जावेंस, अशी माझी त्या वेळीं इच्छा नव्हती, व आजही नाहीं.— अधिराज, माझ्या मुलीला मनाजोगता वर मिळाला तर माझ्या जामाताला हुंडा म्हणून संजीवनी विद्या देईन, असा पुकारा ज्या वेळीं मीं चोहोंकडे

करविला, त्या वेळीं धूर्त देवेंद्रानें रूपगुणसंपन्न कचाला मुद्दाम मजकडे विद्याभ्यासाला म्हणून पाठवून दिलें.—त्याचें कपट आपणांप्रमाणें मींही त्याच वेळीं ओळखलें.

युव०:—होय, आचार्य. देवेंद्राची ही युक्ति ध्यानांत येऊनच बाबांनीं त्या वेळींच गुरुदेवतेपाशीं विनंति केली कीं, शत्रूच्या त्या गोजिरवाण्या पिल्लाला आल्या पाउलीं परतून लावावें; पण गुरुदेवतेनें—

शुक्रा:०—होय, मींच आग्रहानें त्याला ठेवून घेतलें. देवेंद्राच्या जाळ्यांतच देवेंद्राला अडकवावा, असा डाव त्या वेळीं मी खेळत होतों; आणि अजूनही तोच डाव खेळून यशस्वी व्हावें, म्हणून मी एकसारखी धडपड करीत आहें. माझ्या प्रतिस्पर्ध्याचा हा मुलगा—नंदनवनांत शिष्यशाखा पसरून माझ्या सांप्रदायावरही ताण करूं इच्छिणाऱ्या त्या देवगुरूचा हा मुलगा—माझा शिष्यवर्ग आज नंदनवनांत सुखसंचार करीत असल्यामुळें रुद्राक्षाचे वृक्षाखालीं रुद्रवनांत तपस्वी होऊन बसलेल्या त्या जोगी बृहस्पतीचा मुलगा—माझ्या मुलीच्या गुणांवर मोहित होऊन जर माझ्या सांप्रदायांत शिरला, आणि माझा जामात या नात्यानें माझ्या मागून दैत्यगुरूच्या आसनावर विराजमान होण्यास जर राजी झाला, तर देवयानी, अधिराजांनीं देवेंद्रावर मिळविलेल्या विजयाहून फारच मोठा विजय या शुक्राचार्यांनें बृहस्पतीवर मिळविल्यासारखें होईल. ‘कवि’ ‘कवि’ आमच्या गुरूसारखा हा ज्ञानी नव्हे, असें म्हणत मजकडे पाहून देवांनीं नाकें मुरडलीं; तेव्हां कवीच्या भरारीपुढें ज्ञानही ठेंगू होतें, हें देवांच्या प्रत्ययास आणून देण्याकरितां उग्र तपश्चर्या करून मीं संजीवनी विद्या हस्तगत केली; आणि आतां जर माझ्या शरीरापासून निर्माण झालेल्या कविसृष्टींतच सर्व आयुष्य घालविण्यांत स्वर्गसुख आहे असें कचासारख्या ज्ञानज्ञास वाटलें तर हा शुक्र धन्य धन्य ! त्रिवार धन्य होईल.

देवयानी, मला कृतकृत्य करणें तुझ्या हातीं आहे. कचावर प्रेम करूं नकोस, असें माझें म्हणणें नाहीं; उलट तूं कचावर प्रेम करून प्रेमाच्या जोरानें कचाला माझ्या सांप्रदायाचे पचनीं पाड, अशी माझी आज्ञा आहे.

देव०:—बाबा, आपल्या सांप्रदायांत त्यांना प्रेमानें ओढून घेण्यास मी कधीं तरी कमी करीन काय ? वाडवडिलांच्या सांप्रदायांत पुरुषांना गुरफटून टाकण्याकरितांच आम्ही बायका जन्मास आलेल्या असतों.

शुक्रा०:—तें खरें; पण तूं आपली शक्ति माझ्या सांप्रदायाच्या विस्ताराकरितां खर्च करशील, अशी खात्री माझ्या ह्या शिष्यशाखेला पटावी म्हणून संजीवनी विद्येचा प्रसाद तूं घेतलाच पाहिजेस.

देव०:—पण बाबा, त्यांच्या मनांत आत्तां कोठें मजविषयीं उत्पन्न होऊं लागलेलें प्रेम अशा वागण्यानें नाहींसें झालें तर ?

शुक्रा०:—नाहीं. वेडे, नाहीं; तसें होणार नाहीं. प्रेमाची शक्ति केवढी असते, व त्यापुढें मी मी म्हणणारे कसे लटपटतात, हें अद्याप तुला ठाऊक नाहीं. मी सांगतों तसें ऐक. यांत मला यश आहे; अधिराजांना स्वास्थ्य आहे; तुझें कल्याण आहे; व कचाला दैत्यगुरूची पदवी व प्रतिष्ठा मिळणारी आहे.—बाळे, उचल, तो पेला उचल; ने, ओठापाशीं ने. नको, पुन्हा खालीं करूं नकोस. कचाचा अपमान होतो असें जर तुला वाटत असेल—

देव०:—होय बाबा, असेंच मला वाटतें. त्यांचा अपमान न होतां आपला सन्मान करायला मी तयार आहें.

शुक्रा०:—देवयानी, कचाचे उपदेशाचा अपमान होऊं नये म्हणून तूं आपली जीभ दारूनें भिजूं देऊं नकोस; पण माझा सन्मान करण्या-

करितां तूं आपले ओठ त्या पेल्यांतील दारूनें भिजविलेच पाहिजेस. ही माझी आज्ञा आहे! कविराज दैत्यगुरूची ही आज्ञा आहे ! देवयानीच्या पित्याची देवयानीला ही आज्ञा आहे ! तुझ्या भावी पतीच्या गुरुदेवतेची, कचाच्या शुक्राचार्यांची ही आज्ञा—हं !—शाबास बेटा !—ने ओठाजवळ तो पेला !—देवयानी, मनांत शंका आणूं नकोस !—असाच ने ओठाजवळ. यांत कसली कोणाची भीति आहे ?—शाबास बेटा !—भिजीव ओंठ त्या पेल्यांत.

[ देवयानी ओठाजवळ पेला नेते, इतक्यांत कच येतो. ]

कचः—देवयानी, हें तूं काय आरंभिलें आहेस ?

देव०:—अगबाई ! कचदेव आले !

कचः—टाक तो पेला ! दे फेंकून तो. देवयानी तसें करिते. ]

शुक्रा०:—कोण ? कोण तूं ? दारू पिण्याच्या कामींही माझ्या देवयानीवर इतकी सत्ता चालविणारा तूं कोण ?

कचः—गुरुमहाराज ! चंद्राला ग्रहण लागत असतांना राहूला दूर लोटण्याचा प्रयत्न सर्व देव करीत असतात; म्हणून गुरुकन्येला तो पेला दूर फेंकून देण्याला मीं सांगितलें.

पद ९. राग हमीर, ताल एक्का.

[ " तेंडेरे कारन " या चालीवर. ]

विमल अधर, निकटिं मोह हा पापी !
वदन-सुमन-गंध लोपी ॥ ध्रु० ॥
धवला जोत्स्ना राहुसि अर्पी
सुखद सुधाकर, विमल अधर ॥ १ ॥

देवलोकच्या या शिष्टाचाराबद्दल गुरुदेवतेचा मजवर राग होतां कामा नये.

[ अभिवादन करितो. ]



कचः —देवयानी, हे तू काय आरंभले आहेस ? [ पृ० १८.

शुक्रा०:—प्रथम दुसऱ्याला लाथ मारून मागाहून त्याच्या पायां पडण्याचा हाच शिष्टाचार तुला बृहस्पतीनें शिकविला वाटतें !—ऊठ.—पायां पडण्याचें हें ढोंग पुरे.—असा माझ्या समोर उभा रहा. ( कच उठतो ) कचा ! माझा असा उपमर्द करायला तूं माझ्या मुलीला शिकविलेंस; तुझ्या या अपराधाची चौकशी आतांच्या आतां मी करणार; आणि येथल्या येथें योग्य शिक्षा देणार.

कच०:—दारू न पिण्याचा सदुपदेश मीं गुरुकन्येला केला; हा जर अपराध होत असेल—

शुक्रा:—सदुपदेश काय ? सदुपदेश म्हणे सदुपदेश !—अरे, तुझ्या ह्या सदुपदेशानें ही आडदांड झाली, बापाची आज्ञा मोडण्यास शिकली, व सर्वांच्या देखत गुरुजनांचा उपमर्द करण्याइतकी बेपर्वा झाली !—सदुपदेश म्हणे सदुपदेश !—कचा, दारू पिण्यानें कोणाचें अहित आजपर्यंत झालें आहे सांग; दारू न पिणारा आणि माझ्याहून अधिक विद्याव्यासंगी कोणी ब्राह्मण असला तर त्याचें नांव घे.—दारू न पिणारा आणि अधिराजाहून अधिक वैभवशाली कोणी क्षत्रिय असला तर त्याचें नांव घे.—सदुपदेश म्हणे सदुपदेश !—काय ?—आठवतें कोणाचें नांव तुला ?

कच:—देवेंद्र आणि बृहस्पति दोघेही दारू पीत नाहींत.

शुक्रा०:—अन्नान्नगत होऊन जीव वांचविण्याकरितां तोंड लपविणारा प्रत्येक पळपुटा दारू पीत नाहीं ! कचा, तूं माझा शिष्य आहेस, आणि गुरु या नात्यानें मी तुला सांगतों आहें; तूं स्वतः या वेळीं देवयानीला दारू पिण्याचा उपदेश केला पाहिजेस !

कच:—आचार्य, बृहस्पति म्हणजे नेहमीं सावधान राहणारा आत्मा, त्याचा मुलगा हा कच, लोकांस बेशुद्ध होण्यास कसें शिकवील ?

पद १० राग विहाग, ताल त्रिवट.

[ " बालमेरे मोरे " या चालीवर. ]

ने पितरां खर-नरकीं ही मदिरा ।
कच कैसा सेवि खदिरा ॥ ध्रु० ॥
जरि धरि शिरीं तव आज्ञेला ।
परि मानिना कच उन्मादाला ॥ १ ॥
रविकर जरि नभीं लपविला ।
परि होतचि तो वैरि तिमिरा ॥ २ ॥

मद्यपानाचा उपदेश करणें हा देवांचा धर्म नव्हे !

युव०:—गुरुदेवतेच्या आज्ञेचा भंग होत आहे ! सांप्रदायाचे क्षीर-सागरांत हा मिठाचा खडा आहे; दूध नासण्यापूर्वींच याला बाहेर काढून लावला पाहिजे.

सेना०:—देवयानीचें गंगोदकासारखें शुद्ध मन क्षारोदधीप्रमाणें खारट करण्यास हा चुकणार नाहीं !

शिष्य०:—गुरुदेवतेच्या कुळाला अधःपातापासून वेळींच बचावलें पाहिजे.

मधु०:—अगदीं बरोबर!—अगदीं असेंच ! दारू न पिणें हें पंचमहा-पातकांहून अधिक भयंकर पाप आहे.

वृष०:—गुरुदेवतेचा हा असला उपमर्द आम्हां सांप्रदायिकांना पाहवत नाहीं !

युव०:—गुरुदेवतेचा हुकूम व्हावा, एका क्षणांत या अपमानाबद्दल—

शुक्रा०:—थांबा ! मीच काय ती शिक्षा करितों.—कचा, माझा असा उपमर्द करीत जा, असें पढवून बृहस्पतीनें तुला येथें पाठविलें काय ?

कच०:—आचार्य, आपला प्रत्येक शब्द मीं आजपर्यंत शिरसावंद्य मानिला नाहीं काय? कचासारखा आज्ञाधारक शिष्य मीं यापूर्वी पाहिला नाहीं, अशी माझी आपणच कित्येक वेळां स्तुति केलीत, नाहीं काय?—पण मद्यपानाचा उपदेश मी कसा करूं? मद्याचें नांव निघालें कीं, माझ्या जड शरिरांतला प्रत्येक कणन्‌कण, माझ्या रक्तांतील थेंबन्‌थेंब, माझ्या बुद्धीच्या तेजांतील किरणन्‌किरण, कचा, या दुष्ट व्यसनाशीं झुंजण्यास सज्ज हो; असें माझ्या कानाशीं ओरडून मला चेतवून सोडतो!—या कामीं आज्ञाभंगाचें पातक माझ्या माथीं न मारतां गुरुदेवतेनें माझ्या मस्तकीं अभय हस्तच ठेविला पाहिजे.

शुक्रा०:—कचा, तूं मलाही उपदेश करण्याचा आव घातलास हं!

युव०:—हा गुरुदेवतेचाही गुरु झाला!

शुक्रा०:—कचा, तूं माझा उघड अपमान करीत आहेस; आतां तुला येथून हांकून दिल्याशिवाय मला गत्यंतर नाहीं. बोल, मीं सांगितल्याप्रमाणें देवयानीला उपदेश करितोस, का आतांचे आतां—

देव०:—(शु० चे पाय धरून) बाबा, आतांचे आतां शिक्षा करण्यास प्रवृत्त होऊं नका! माझी आई जर जिवंत असती तर तिनें असें करूं दिलें नसतें.—आई जर जिवंत असती—असें मी कशाला म्हणूं? हेच पाय मला आईच्या जागीं आहेत.

पद ११. राग भीमपलास, ताल त्रिवट.

[ " तुमसन लागी रटना " या चालीवर. ]

दिसत न कशी ममता? कवि पिता हो माता ॥ ध्रु० ॥
दुःखित जगासि दयार्द्र लोचन कविजन।
विकसवि आतां नयन ॥ १ ॥

थोड्या वेळाची, बाबा, थोड्या वेळाची फुरसत द्या. मी त्यांचीं आर्जवें करून पाहतें.

शुक्रा०:—देवयानी, तुझ्याकरितां कचाला मी एक दिवसाची फुरसत देतों.—अधिराज, उदईक याच वेळेला सरस्वतीपूजनाला आपण सर्व या ठिकाणीं पुन्हा जमूं. त्या वेळीं कचा, सरस्वती होऊन बसलेल्या देवयानीला मद्याचा नैवेद्य तूं स्वतः दाखविला पाहिजे, आणि देवयानीनें त्या नैवेद्याचा स्वीकारही केला पाहिजे; असें न होईल तर कचा, तुला तत्क्षणीं हांकून देण्यांत येईल !

[ पडदा पडतो.



# प्रवेश दुसरा.



### स्थळ--शिष्यवराचें मंदिर.

[ शिष्यवर हातांत आरसा घेऊन त्यांत चेहरा पाहत प्रवेश करितो. ]

शिष्य०:—इतके दिवस या पांढऱ्या केसांकडे माझें कसें लक्ष गेलें नाहीं कोण जाणे !–चोरून दडून वर डोकें करूं पाहत आहेत, तोंच यांना वेळींच समूळ उपटून टाकले पाहिजेत. ( चिमट्यानें पांढरे केस उपटतो. ) कोण त्रास आहे हा ! पण देवयानीकरितां हेही हाल सोसले पाहिजेत.—आज मला ज्ञान झालें, बापाच्या व्यसनांत समान-शील झाल्यानें मुलीशीं कांहीं सख्य जुळत नाहीं !—पखालीनें दारू पिऊं लागल्यापासून हा शिष्यवर आचार्यांच्या मर्जींतला शिशीधर झाला खरा—ह्या–ह्या–पांढऱ्या केसांनीं देवयानीला कचाकडे पहावयाला लावलें !–( केस उपटीत ) मला आतां भीति पडली आहे, आचार्यां-प्रमाणें तुम्हीही मला बाप शोभतां, असें देवयानी म्हणते कीं काय !—माझ्या बाबांना मी पाहिला मुलगा झाल्यावर दारूच्या व्यसनामुळें ते एकदम म्हातारे झाले, आणि पहिला मुलगाच शेवटचा ठरून मी एक-टाच त्यांच्या सर्व जिनगीचा मालक झालों; हें मदिरेनें चांगलें केलें. परंतु माझ्या लग्नाच्या नुसत्या गोष्टीच इष्ट-मित्र बोलूं लागले आहेत, तोंच मी पुरता म्हातारा दिसूं लागलों !–यालाही उपटलाच पाहिजे—नाहीं सोस-वत या यातना !—आम्ही दारूबाजांचीं कार्टीं तरुणपणींच टक्कल पडलेलीं किंवा पिकलेल्या केसांचीं असावयाचीं !—मला स्वतःला माझा चेहरा आरशांत पाहवत नाहीं, मग देवयानी मजकडे कोठली पहायला !—वृद्ध कचांबरोबरच ह्या तरुण कचांनाही चेहऱ्यावरून हांकून दिलें

पाहिजे; कारण काळ्या केसांनींही माझा गोजिरवाणा चेहरा विद्रूप करून टाकला आहे.

पद १२. राग मांड, ताल दादरा.

[ " नच वृत्तांत पुसे " या चालीवर. ]

मुखचंद्रासि असे, ग्रहंण जसे, कच साचे,
ओझें मज केश होतसे, अशुभचि राहु दिसे ॥ ध्रु० ॥
भाले हे मृदुल मुखा, नीरस हो प्रेमसुखा,
कुटिल सकल खल देखा; भासे कच येथ वसे ॥ १ ॥

तरुण प्रेतांनीं आणि तान्हुल्या थेरड्यांनीं गजबजलेला दारूबाजांचा माझ्या सभोंवारचा घोळका मीं पाहिला म्हणजे वाटतें, शंकरा, शुक्राचार्यांची ही संजीवनी विद्या हिरावून घे, आणि मृत्युरूपी अग्नींत दुबळ्या देहांचा हा पाचोळा जाळून पृथ्वीतल होईल तितक्या लवकर निर्मळ कर.— हीं किडलेलीं फळें, गळलेलीं फुलें, पिकलेलीं पानें व कुजलेलीं मुळें संजीवनी विद्येनें निरंतरचीं जिवंत ठेवण्यापेक्षां, पांढऱ्या कैंसांचे काळे कैंस करणारी संजीवनी विद्या जर शुक्राचार्यांनीं शंकरापासून पैदा केली असती—

[ रसिका व मधुकर प्रवेश करितात. ]

मधु०:—तीच विद्या रसिकेबरोबर युवराजांनीं आपणांकडे पाठविली आहे.

रसि०:—या दोन डब्यांतून दोन विद्या भरून मी आपणांकडे आणल्या आहेत.—कैंसाला लावण्याच्या ह्या संजीवनी विद्येला काजल्य असें म्हणतात; आणि गालाला लावण्याच्या ह्या संजीवनी विद्येला कसलचूर्ण असें म्हणतात.



चित्र.—रसिके आतां मी ताजा तरुण दिसतों कीं नाहीं ?

[ पृ० २५.

शिष्य०:—( केंसाला काजळ लावीत व गालाला पूड चोळीत ) कां रसिके, आतां मी ताजा तरुण दिसतो कीं नाहीं ?

मधु०:—अगदीं बरोबर !—अगदीं असंच. या नवीन विद्येनें आपल्या तारुण्यांतील शिळेपणा नाहींसा होऊन ताजेपणा गालावर आला आहे. आतां आपण दारू प्यावयाला आरंभ करूं या, म्हणजे चेहऱ्यावर कोंवळेपणा चमकूं लागेल !

रसि०:—

पद १३. राग काफी—धानि पिलू, ताल दादरा.

[ "बालमुजे साडी गुलाबी" या चालीवर. ]

भास मला झाला, पाहतां कपोला,
इंदु तो नभींचा सेवि भूतलाला;
येथ दिसे ही आप्तलोकांशुमाला तयाला ॥ ध्रु० ॥
अधरबिंब धरि सुधेसि, रजनी ही केशराशि,
नयन गोल दावि लोल तारागणाच्या प्रभेला ॥ १ ॥

शिष्य०:—रसिके, खरेंच का मी फारच सुंदर दिसतो ?—माझी आवाजी जर गोड असती, तर कचाला देवयानीपुढें क्षणभर टिकूं दिलें नसतें !—माझी नरडी बारीक होती, पण आतां कांय ?—एकाएकीं फुग-लेली नदी फोंफावून वाहत असतांना आपल्या तटांची माती खरडून काढून पाणी गढूळ करिते, त्याप्रमाणें दारूचा प्रवाह माझ्या गळ्यांतून जोरानें वाहूं लागल्यामुळें गळ्याचे बांध तुटून आवाज गढूळ झाला आहे !—गढूळ गळ्यावर एक नवीन संजीवनी विद्या युवराजांनीं शोधून काढली आहे, ती नाहीं बरोबर आणलीस ?

रसि०:—युवराज म्हणाले, या दोन विद्येंत शिष्यवर तरबेज झाले म्हणजे गळोटीची विद्या–

मधु०:—गळोटीची विद्या !–गळोटी म्हणजे ?

शिष्य०:—गळोटी ही लंगोटीसारखीच एक चिंधी आहे! फरक इतकाच कीं, लहान मुलांच्या चिंधीला लंगोटी म्हणतात, आणि दारूमुळें गळा फाटत जाऊन रुंद रुंद होऊं नये म्हणून प्रतिष्ठित दारूबाज जी चिंधी वापरतात, तिला गळोटी असें म्हणतात. चिंधी तीच, पण स्थानभिन्नत्वानें नामनिर्देशही भिन्न होतो, असा भाषाशास्त्राचा नियम आहे.

रसि०:—गढूळ गळ्यावर गळोटी संजीवनी विद्या समजली जाईल इतकेंच नव्हे, तर युवराज म्हणत होते— [ युवराज येतो. ]

युव०:—गळ्यांत जानवें असलें म्हणजे मुंज झाली आहे हें जसें ओळखावयाला येतें, त्याप्रमाणें गळ्यांत गळोटी असली म्हणजे शुक्राचार्यांची दीक्षा मिळाली आहे, हें ओळखण्यास सोईचें होईल. गळोटीची विद्या तुम्हां सर्वांना पसंत पडली तर शुक्राचार्यांची दीक्षा घेणारांशिवाय इतर कोणालाही–त्याचा आवाज कितीही फुटला असला तरी, इतर कोणालाही–गळोटी वापरूं देतां कामा नये, असा हुकूम आचार्यांकडून मी जाहीर करविणार आहें.

शिष्य०:—काय बुद्धि चालती आहे! मला माझ्या बुद्धिवैभवाची व शास्त्राभ्यासाची फार घमेंड होती, पण युवराजांनीं शोधून काढलेल्या या संजीवनी-त्रयीकडे पाहिलें, आणि त्यांतल्या त्यांत ही गळोटीची युक्ति ध्यानांत धरली, म्हणजे माझी त्रयीविद्येची घमेंड तेव्हांच मावळते; आणि ज्यांच्या पायापाशीं कित्येक वर्षें आम्ही वेदाभ्यासी तपस्व्यांनीं शिकत रहावें,

असे महात्मे आहेत, अशी खात्री पटते. नव्या त्रयीविद्येचा उगम याच पायांपासून व्हावा हें, उचित होय.

रसि०:—

पद १४ राग भूप, ताल दादरा.
[ " श्रीगुरुसि नमन " या चालीवर. ]

श्रीचरण शिकवि सकल ज्ञान सेवकां सदा ।
कविसम याचि पदा वरण्यातें विद्या,
मुखमल हरि, कच नव धरि, रव मधु करि,
रिचत तोषदा ॥ ध्रु० ॥
कवि तापसी । ज्ञान त्यांसी । शंभु तो । देई ॥
न तप केलें । ज्ञान उदेलें । या देहीं । सहज संपदा ॥ १ ॥

युव:०—शिष्यवरा, स्नेह्यांचे मनांतील पूज्यबुद्धि महत्कार्यास प्रवृत्त करिते; पण या वेळीं आपण मजसंबंधानें काढलेले उद्गार माझी काळजी दूर करीत नाहींत. कारण मीं सांप्रत मनांत योजलेलें महत्कार्य माझ्या हातून पार पडावयाचें नसून, शिष्यवर, आपल्या हातून पार पडावयाचें आहे.

शिष्य०:—धनिकांचा एक शब्दही मद्यप्यांच्या हातून मोठमोठीं कामें सहज करून घेतो. मग युवराज, आपणांस काळजी कसली ?

युव०:—मित्रा, तूं आचार्यांचा जामात झाल्याशिवाय संजीवनी-विद्या सुरक्षितपणें आमच्या मंडळांत नांदेल, असें मला वाटत नाहीं; आणि शिष्यवरा, उदईक जर कचानें दारू घेतली—

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच. कच दारू प्याल्याशिवाय राहणार नाहीं. कारण प्रत्येक संभावित विद्वान् दारू पीत असतो, आणि कच विद्वान् आहे, असें म्हणतात. पण तो संभावित आहे किंवा कसें—

रसि०:—अरसिक आहे मेला !–तो कसची दारू पिणार ?

शिष्य०:—मला वाटतें, तो दारू पिणारच नाहीं. हट्टी आहे; मजसारखा लवचिक नाहीं. हरएक रसाला साजेसें वर्तन ठेवण्याइतका कचाचे मनाचा पातळ फैलाव विद्येमुळें अद्याप झालेला नाहीं. विद्येनें विरघळून जाऊन मन प्रथम पातळ व्हावें लागतें; तरच तें दारूकडे आपोआप पळूं शकतें. म्हणून मी म्हणतों, तो संभावित नाहीं तो नाहींच, पण खराखुरा विद्वानही नाहीं; तेव्हां दारू कांहीं केल्या तो पिणार नाहीं. विद्वान् असता तर यापूर्वींच दारू पिऊं लागला असता; खरी विद्वत्ता अशी झांकून राहत नाहीं.

युव०:—शिष्यवरा, नायकांच्या नादीं लागून तपस्वीही दारूबाज बनतात. देवयानीचें सौंदर्य कचाला मद्यपी करील, असें मला वाटतें. शिवाय दारू पिऊन देवयानी व संजीवनी विद्या या जोडीला जर आमच्या नगरींतून पळवून नेतां आलें, तर दारू तरी कचानें कां पिऊं नये ? मला संशय येतो, फळ पुरतें पिकून आयतें पदरांत पडायची वेळ येई तों, हा कावेबाज कच दारू जिभेवर ओतण्यासंबंधानें ओढून धरणार, आणि आचार्य पुरते तावडींत सांपडले आहेत असें पाहून, ही स्वारी देवयानीसकट विद्याहरण करून एखाद्या रात्रीं येथून पोबारा करणार !

शिष्य०:—मग मी जामात कोणाचा होणार ? विद्वानानें आपले पुढले बेत आगाऊ आंखून ठेवले पाहिजेत; कारण विद्येच्या इतकी दूरदृष्टि दुसऱ्या कोणाला नसते. देवयानीला कचानें पळवून नेल्यावर मी कोणाशीं लग्न करायचें ? आतांपासून ठरवून ठेवलें पाहिजे.

युव०:—नाहीं. मित्रा, तुझेंच लग्न देवयानीशीं झालें पाहिजे.

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच. आणि त्या लग्नाचे महोत्सवाप्रीत्यर्थ आतांपासूनच दारू पिण्यास सुरवात करूं या; म्हणजे पुढील कार्यांचा प्रारंभ शिशीधराचे विद्वत्तेस साजेसाच झाल्यासारिखें होईल.

युव०:—गप्प बैसरे मधुकऱ्या ! ह्या फुकऱ्यांना दारूशिवाय दुसरें तिसरें कांहींच सुचत नाहीं. शिष्यवरा, कच उद्यां दारू पिवो वा न पिवो, तुझ्या सुखाच्या आणि माझ्या वैभवाच्या मार्गांतला तो कांटा आहे, आणि तो उपटून टाकलाच पाहिजे.

शिष्य०:—कांट्यावर पाऊल टाकणारा विद्वानच नव्हे.

युव०:—कच कांटा आहे, असें त्याला दूषण ठेवून तूं कुरापत काढ; मग सेनापति व माझे लोक पुढचें काम उरकून घेतील. कुरापत काढण्याचें काम तुझें.

शिष्य०:—आपण प्रसंग साधून द्या, कीं मी कचाला नडवितों. तो असें बोलला, तर मीं तसें बोलीन; तसें बोलला तर असें बोलीन; दारूच्या खुराकाचा रतीब लावून वितंडवादाच्या तालमींत कसरत केलेला हा शिष्यवर आहे ! मद्यपानासंबंधानेंच मी कुरापत काढतों. वादांत जिंकून त्याच्या छातीवर बसून मी माझा उष्टा पेला त्याच्या घशांत ओततों, तरच नांवचा विद्वान् !

युव०:—बस्स ! हें ठरलें. कुरापत तूं काढायची, सेनापतींनीं काम उरकायचें ,आणि आचार्यांच्या जवळ जाऊन मीं तें निस्तरायचें. चल रसिके, चल मजबरोबर. मला हा बेत बाबांच्या कानावर घालून ठेवल पाहिजे. शिष्यवरा, देवयानीच्या समक्ष तुला कुरापत काढावी लागेल, आणि त्या वेळीं तुझी झुंज जाड्या विद्वत्तेला शोभेल अशी—

शिष्य०:—त्याची नको काळजी ! मी आतां प्रहरा दीडप्रहरांत सर्व पोथ्या-पुस्तकें उलथीं पालथीं करून टाकतों. माझी दृष्टि पुस्तकांवरून फिरली म्हणजे, चाक्षुषी प्रेमाच्या पहिल्याच दृष्टीनें आषुकमाषूक जसे बद्ध होऊन जातात, त्याप्रमाणें पुस्तकांतील मुद्दा बुद्धीशीं ताबडतोब संलग्न होऊन जातो. याला म्हणतात विद्वत्तेचें खरें लक्षण ! दारू पिणें हें आंतलें लक्षण आहे, आणि मुद्दे बाहेर खेंचणें हें बाहेरचें लक्षण आहे. मुद्द्यावर मुद्दे ! कचाला चीत करतों ! देवयानी नुसती टकमक पाहत उभी राहील!— पण बरी आठवण झाली, मला ही तरतूद अगोदर केली पाहिजे, त्या वेळीं एकही पांढरा केस तिच्या नजरेस पडतां कामा नये !

रसि०:—मी त्याची तजवीज लावीन, समजलास रे मधुकऱ्या ?

मधु०:—हें कायहो बाई ! ज्यांनीं त्यांनीं मला मधुकऱ्या म्हणावें म्हणजे काय ! महाराज मधुकऱ्या म्हणतात, म्हणून तुम्हीं मधुकऱ्या म्हटलेलें मला खपायचें नाहीं हो !

रासि०:—मोठा आला आहे मेल्याचा दिमाख ! फुकटची दारू प्यावयाची आणि मधुकऱ्या म्हटल्याबद्दल—

युव०:—अग त्याला मधुकऱ्या नको म्हणूंस, फुकट्या म्हण. दारू आयती मिळाली तर तो पितो; भीक मागून कांहीं पीत नाहीं. फुकट्याला भिकारी म्हटल्याचा राग येतो.

शिष्य०:—हात पसरण्यापेक्षां अयाचितवृत्ति अधिक प्रतिष्ठेची असून विद्वानांना भूषणावह आहे. तेव्हां मधुकरा ‘ फुकट्या ’ हें नामाभिधान तूं अभिमानपूर्वक ग्रहण कर.

रासि०:—मला दुसरें तिसरें कांहीं सांगायचें नाहीं, समजलास रे फुकट्या

मधु०:—फुकस्या ! फुकस्या !

रसि०:—यांचें पोथ्यापुस्तकें उलथींपालथीं करण्याचें झालें म्हणजे मला वर्दी दे. मग मी नटायचें सजायचें कसें, हें शिष्यवरांना शिकवावयाला येईन.

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच. शिष्यवर देवयानीच्या डोळ्यांत शिरतील, असेंच रंगरोगण यांच्या विद्वत्तेवर चोपडलें पाहिजे. तुम्ही चेहऱ्याची साफसुफी व डागडुजी करा, मीं दारू पिण्यांत मदत करीन; म्हणचे तुमच्या सफेतीवर माझा तांबूस तजेला येईल.

युव०:—वा ! फुकस्या, ठीक योजना !—ए फुकस्या, रसिकेला वर्दी दे हं ? [ युवराज व रसिका जातात. ]

शिष्य०:—फुकस्या ! फुकस्या !—आज आपणांला युवराजांनीं नवीन पदवी दिली !

मधु०:—हें पहा शिष्यवर, मी साफ सांगतों; आचार्यांनीं मधुकऱ्या म्हटलें, युवराजांनीं फुकस्या म्हटलें, म्हणून ही रसिका फुकस्या म्हणणार कोण ?

शिष्य०:—अरे म्हणूं दे, तुला ती फुकस्या म्हणूं दे. देवयानीशीं माझें लग्न व्हावयाचे वेळीं या रसिकेशींच तुझें लग्न लावून टाकूं, आणि तिचें सासरचें नांव फुकटी ठेवूं म्हणजे झालें.—प्रत्येकानें तिला फुकटी म्हणावें.

मधु०:—मला एक वेळ फुकस्या म्हटलेलें चालेल, पण आमच्या बायकोला कोणींही फुकटी म्हणतां कामा नये.

शिष्य०:—अरे यांत कसला रागावतोस !—विद्येचा खरा संस्कार अद्याप तुझ्या मनावर झालेला नाहीं.—अरे हा युवराज काय, मी काय,

तूं काय, ही रसिका काय–सर्वच आम्ही फुकटे !–शुक्राचार्यासारखे फारच थोडे लोक विकतचे असतात; किंबहुना विश्वांतील सर्व रस व्यसनी फुकट्यांचा.–मद्यपानासारख्या चैनीला असल्या चार फुकट्यांची चौकडी जुंपल्याशिवाय, गरगर फिरावयास लावणाऱ्या उन्मादाचा वेग केव्हांही उत्पन्न होत नाहीं.–ह्या युवराजाला कोठें मेहनत करावी लागली आहे ? फुकटची बापाची दौलत !–युवराज म्हणजे चैनी चौकडींतील धनिक फुकट्या होय. सर्व मादक विलासांचा उगम धनिक फुकट्यांपासून होत असतो, म्हणून फुकट्यांच्या माळेंत युवराजाला मी अग्रस्थान दिलें आहे.–मी पडलों विद्वान् ! चैनीला दूषणें देऊन आम्हांला चांडाळ-चौकडी म्हणणारांच्या अंगावर मी सशास्त्र सप्रमाण गुरगुरतों, व त्यामुळें माझ्यासारख्यांच्या अकलेची फार जरूरी धनिक फुकट्यांना वाटते.–चौकडींतला मी विद्वान् फुकट्या होय.–रसिकेसारख्या गुणी जनांशिवाय ऐषआरामांत नेहमीं रस वाहत नाहीं; चैन रसभरित ठेवण्याकरितां धनिक व विद्वान् फुकटे ज्या गुणी जनांना जवळ करितात, त्यांना रसिक लोक फुकट्या असें म्हणतात.–रसाच्या थेंबासाठीं होयबा म्हणून धनिक फुकट्यांची पडेल ती सेवा करणारांचे खरें नांव जरी कामकरी फुकट्या असें आहे, तरी तुजसारख्या मित्रांना वाईट वाटूं नये म्हणून मजसारखे विद्वान् नुसत्या ‘ फुकट्या ’ या नावानेंच तुला संबोधित असतात.–अरे आम्ही सर्वच फुकटे ! त्यांत कसली लाज मानायची ? विद्येनें नाहीं तरी दारूनें तरी तुझी लाज–शरम–पार धुवून जायला पाहिजे होती.–हें पहा आम्ही सर्व फुकटे एका माळेचे मणि आहोंत, हें सर्वांना दाखविण्याकरितां तुझ्या गळ्यांत गळा घालून तुला असा बरोबर घेऊन जातों.

[ जातात. ]



## प्रवेश तिसरा.



[ देवयानी प्रवेश करिते. ]

**देवयानी:—**

पद १५. जिल्हा खमाज, ताल पंजावी.

[ " तनमनकी सुध बिसर गई " या चालीवर. ]

मधुमधुरा तव गिरा मोहना, भासे निशेची भूल मना ॥ ध्रु० ॥
मदिरा म्हणूं तरी ती भ्रांती; मधुरिपु हाचि खरा ही ख्याती;
दीनवशेपरी मनधरणी ही करवि, हें नवल होई जना ॥ १ ॥

देव०:—गाण्याचे भरांत येऊन ते गाऊं लागले म्हणजे माझी ही अशी स्थिति होते; त्यांच्या कलाविरुद्ध रतिभरही जाऊं नयेसें वाटतें. बाबा सांगतात त्याप्रमाणें कांहीं काळ तरी दारूचा स्वीकार करा, म्हणून विनंति करायला मी मघाशीं आलें; पण कचदेवा, गातांना तें आनंदी मुखकमल पाहून माझ्या भिन्न इच्छा लयाला गेल्या; आणि कांहीं न बोलतां मी मागें परतलें !—कचदेवावर मी प्रेम करितें ना ? मग त्यांची इच्छा तीच माझी इच्छा नको का असावयाला ? एरवीं प्रेम तें कसलें ?—कचदेवा, आपण माझ्यावर प्रेम करितां ना ? मग थोडा वेळ तरी माझ्या इच्छेप्रमाणें आपण नाहीं का वागणार ?—पण बाबा, कचदेवांच्या इच्छेहून निराळी इच्छा या प्रेमी देवयानीनें कोठून आणावी ? कचदेवा, आतां एवढी भीक घालाच; मजजडे आनंदी मुद्रेनें पाहूंच नका. धीटाईनें मी आपल्यापुढें उभी ठाकलें म्हणजे, कपाळावरील आठ्यांच्या भारामुळें कठोर झालेल्या, लाल डोळ्यामुळें संतप्त दिसणाऱ्या, फुगलेल्या नासिकेमुळें सर्व विश्वाला धिक्कारणाऱ्या, आणि

दातांनीं चावलेल्या ओठामुळें चिडलेल्या आपल्या रागीट मुद्रेनें, नजरेच्या पहिल्या धक्क्यासरशीं दोन पावलें मला मागें लोटा. कचदेवा, एवढें माझें ऐकाच. विजेप्रमाणें कडकडणारी आपली वाणी जिभेच्या मुळावर चढूं पाहणाऱ्या माझ्या शब्दांना कंठाखालीं दडपून टाकूं द्या.—सख्या, मला तुमच्याशीं भांडतांच येत नाहीं; तेव्हां कसेंही करून अशा रीतीनें मला झिडकारून माझ्याशीं भांडायला देवा, तुम्हीच सुरवात करा. म्हणजे थोडा वेळ तरी एकजीव होण्याचा आनंद विसरून जीवाच्या भिन्नत्वाचा अहंकार माझ्या अनुभवाला येईल; आणि त्या अहंकाराच्या सत्तेनें माझ्या अंगच्या सर्व शक्ति उपयोगांत आणून दारूचा स्वीकार करण्याविषयीं विनंती करण्याचें मी धाडस तरी करीन.—प्रेमी देवा, मला पाहिलंत कीं, भांडायलाच लागा!

पद १६. राग सारंग, ताल केरवा.

[ " जमुनातट " या चालीवर. ]

तरुला प्रिय ताप करी, सकला ॥ ध्रु० ॥
तीव्र ताप, निज वाणी करो कच ।
तरुहि पिताचि गमो मजला ॥ १ ॥



## प्रवेश चवथा.



**स्थळ**—सरस्वतीपूजनाची जागा.

[ मद्याचे घट भरून ठेवले आहेत, ते पहात कच प्रवेश करितो.]

**कचः**—मद्यानें भरलेल्या या घटांचा नैवेद्य सरस्वतीला दाखवायाचा हं!—हे सरस्वतीला समजतात तरी काय? स्वतःच्या कृतीचा अहंकार अंगावर चढूं नये म्हणून, सृष्टि निर्माण करण्यापूर्वीं ब्रह्मदेवानें ही ब्रह्मकुमारी प्रथम उत्पन्न केली; आणि हरएक प्रकारचा उन्माद शांत करण्याची कामगिरी तिला सांगितली. सर्व विश्वाकरितां विचार करण्याची जबाबदारी ज्या बुद्धीवर, त्याच बुद्धीला जर मदिरेच्या उन्मादाच्या रसांत आम्हीं बुडविलें, तर सरस्वतीच्या गळ्यावर तिच्या वैरिणीची सुरी ठेवल्यासारखें नाहीं का होणार? सरस्वतीला तिच्या वैरिणीचा सहवास घडतांच कामा नये.

पद १७. राग पूर्याधनाश्री, ताल झपताल.
[ " दत्त गुरु दत्त गुरु " या चालीवर. ]

मद्यमद चोरि तप दाउनी सुख नरा।
चौरिकहि बलंभास, शापयोग्या सुरा ॥ ध्रु० ॥
ही वारयोषिता दारुणा सेविता।
भस्म करिते जनां, व्याधि भयकरा ॥ १ ॥

बुद्धीच्या वैरिणीला तिची सोबतीण करून सरस्वतीचा गळा कसानें मी कसा सोडवूं? आम्हां सरस्वतीभक्तांचें सरस्वतीवरील निस्सीम प्रेम कलुषित करून स्वतःच्या मोहाच्या घाणेरड्या डबक्यांत आम्हांस बुडवूं पाह-

णाऱ्या या कुलटेला–(देवयानी येते.)–कोण, देवेंद्राची नात देवयानी-कोण ? देवाविषयींच्या अभिमानांत सुख मानणारी कविकन्या देवयानी-नव्हे ? मग कोण–आपल्या सौंदर्यातिशयानें या कचाला भुलवून कंठमा(ु)यींत मला बुडवून टाकणारी माझी जादुगारीण—

देव०:–नव्हे ! महाराज नव्हे. जिच्या सौंदर्याची तारीफ करतां(ं)कविस्फूर्ति आपले अंगांत संचारते ती देवयानी मी नव्हे; जिच्या हाताचा स्पर्श झाला असतां आपली स्थिर बुद्धि सर्व तरल लहरींनीं न(ा)लेल्या मदिरेची मूर्ति एकदम बनते, ती देवयानी मी नव्हे; जिच्या गाण्याचा स्वर कानीं पडला असतांना अंगीकृत कार्याची सर्व आठवा(ण)विसरून प्रेमानंदांत आपण डुलत राहतां, ती देवयानी मी नव्हे !

कचः—तर मग तूं कोण ?–असलें हें सौंदर्य, असलें हें मधु(र)भाषण, असला हा विनय देवयानीशिवाय इतर ठिकाणीं संभवतच नाहीं. देवेंद्राच्या सेनेचा पराभव करण्याकरितां वृषपर्वा शुक्राचार्यांच्या तपश्चर्ये(च्या)मुळें जसा जन्मास आला, त्याप्रमाणें देवेंद्राच्या अप्सरांना लाजविण्याकरि(तां)आचार्यांची तपश्चर्या लावण्यसीमा देवयानीच्या रूपानें प्रसवली ! त(्या)देवयानीवर ताण करण्याचें तर बाजूलाच राहूं दे, पण तिची बरोब(री)करूं शकणारी एकही देवाङ्गना मला माहीत नाहीं; आ(णि)म्हणूनच देवेंद्राचे सभेत देवयानीचें मन प्रसन्न करून घेण्याचा विडा (मी)हौसेनें उचलला.—

पद १८. राग किर्वाणी, ताल दादरा.

[ " वरसुल सखि " या कानडी चालीवर. ]

सुरसुखखनि तूं विमला सगुणा कविबाला ॥ ध्रु० ॥
वदनमणि मज, रमणी, अचुक दावि मार्गाला ॥ १ ॥

देवयानिदेह धरे अमरविभवगुण सारे।
सकलकला कवितनुजाचरण मला ॥ २ ॥

तूं ती देवयानी नव्हेस तर कोणती देवांगना आहेस ? या देवांगनेचें नांव मला समजेल काय ?

देव०:—महाराज, मी या वेळीं देवांगना नाहीं; पण आपणांला प्रसन्न करून देवांगना होऊं इच्छिणारी मी एक कुमारी आहें. मीं असें ऐकलें आहे, बृहस्पतीचे प्रख्यात चिरंजीव कचदेव म्हणे आमच्या या नगरींतील एका कुमारिकेला पाणिग्रहणानें देवांगनेचा बहुमान देणार असून—

कच:—होय. शुक्राचार्यांची मुलगी देवयानी ही जर देवांगना झाली तर देवेंद्रासह सर्व देव स्वतःस कृतकृत्य समजतील, इतकेंच नव्हे तर हा कचही—देवयानी, देवांगना होण्याचा तुझा विचार ठाम ठरला ना ? देवयानी, इतकें बोलल्यावर आतां मुग्धता कां ?—विनयामुळें प्रेमाच्या लाटा दबल्या जातात,आणि अशा लाजण्यांत त्या लाटा विरघळून जाऊन त्यांच्याबरोबर आपल्या पुढील बेतास ओहटी लागते कीं काय, अशी मला भीति वाटते !—देवयानी, नुसत्या लाजण्यानें तूं देवांगना कशी होशील ?—तुझा ठाम विचार ठरला ना ? मग पाणिग्रहणाचा वाग्निश्चय कां नको ?—बोल, निश्चयाचा तो गोड शब्द बोल.

देव०:—महाराज, आपण म्हणतां ती देवयानी मी नव्हे.—बाबांच्या संमतीनें केव्हां लग्न व्हावयाचें असेल तें होवो, पण आपआपसांत वाग्निश्चय करून ठेवण्यास कोणाची हरकत, म्हणून आपणांस विचारणारी ती देवयानी मी नव्हे.

कच०:—तर मग तूं कोण ?

देव०:—आपल्यापुढें या वेळीं मूर्तिमंत मदिरा उभी आहे, अं
समजा. आपण मघांशीं म्हणत होतां तीच कुलटा प्रत्यक्ष उभी आहे अं
समजा. महाराज,मला आपल्या मंदिरांत वावरूं देणें आणि मद्याचे घ
भरून ठेवणें सारखेंच; माझा सहवास आपणाला प्रिय वाटेल काय ? माझ
हात आपण आपल्या हातांत घेणें आणि दारूनें भरलेला पेला हातां
उचलणें सारखेंच; पाणिग्रहणाच्या वेळेला माझा स्पर्श आपणांस सुखाव
होईल काय ? माझें चुंबन घेणें आणि दारू पिणें सारखेंच; आपल्य
अर्धांगीच्या अधरांत अमृत आहे असा आनंद माझ्या प्रेमा
आपणांस होईल काय ? —महाराज, आपल्यापुढें देवयानी उभी नसू
बोलती चालती साक्षात् दारू उभी आहे !

कचः—देवयानी, स्वतःला दारू म्हणवून घेण्यांत तुला भूष
वाटतें हं ! मद्याचें नांव निघालें कीं माझ्या पायाची आग मस्तकाल
जाते, माझा क्रोध भडकून जातो, व काय करूं आणि काय नको अ
होऊन जातें.— आज तुझ्या मनांत तरी काय आहे ?

देव०:—असेंच आपण रागवावें असें माझ्या मनांत आहे.—
असली रागीट मुद्रा पाहिली—चढूं देत अशाच त्या भिवया वर चढूं देत
त्यामुळें माझ्या धिटाईला भरती येते—फिरवा असेंच तोंड फिरवा, विनंत
करण्याच्या धाडसाकडे माझें मन आपोआप फिरतें—टाका असेच क्रोधा
दीर्घ श्वास टाका, हृदयांतील प्रेमाचा कोंडमारा फोडून माझी विनं
उसळीसरशी बाहेर येऊं लागते,—

कचः—देवयानी तूं हें काय बरळतेस ?

पद १९. राग सोहा कानडा, ताल एक्का.

[ " तू है महमदसा " या चालीवर. ]

तूं कां वदासि मला कटु बोला,
अबोला वरा या काला ॥ ध्रु० ॥



देव०:—असेंच आपण रागवावें असें माझ्या मनांत आहे. [ पृ० ३८.

प्रेमनाश झाला, केंवि राग आला ?
नच मधु ने नाशा भ्रमराला ॥ १ ॥

तुझ्या आणि माझ्या प्रेमांत कोणी तरी विष कालविलेलें दिसतें; सांग देवयानी सांग; तुझ्या तोंडचे कठोर शब्द ऐकायला मी तयार आहें.

देव०:—महाराज, आपल्या प्रेमांत कोणीं विष कालविलेलें नाहीं; माझ्या बाबांचा राग शांत करण्याकरितां एक वेळ तरी थोडीशी दारू प्रेमांत कालवा, अशी आपल्या देवयानीची आपणांस विनंती आहे.

कचः—देवयानी, दारू पिण्याचें मीं सोडून दिलें, सोडून दिलें, सोडून दिलें, अशी शपथ तूं त्रिवार मजपाशीं वाहिली असतांना मलाच असा उलटा उपदेश करायला तूं कशी तयार झालीस ?

देव०:—महाराज, कशी म्हणून काय सांगूं ? उदईक आपण जर मद्याचा नैवेद्य सरस्वतीला दाखविला नाहीं, तर बाबांचा राग कांहीं शांत व्हावयाचा नाहीं. महाराज, एक वेळ मद्यप्राशन केल्यानें फार झालें तर आपल्या प्रेमसागरावर अविचाराचें थोडेसें वादळ उत्पन्न होईल; आणि मला वाटतें, थोडासा तरी अविचार असल्याशिवाय धाडसी पुरुषांना प्रेम मिळमिळीत लागण्याचा संभव आहे. अविचाराच्या लहानसहान वादळांचें भय आपल्यासारख्या ज्ञानकंदांना वाटतांच कामा नये.—पण महाराज, या वादळांना टाळण्यासाठीं जर आपण ह्या वेळीं बाबांच्या मर्जीप्रमाणें थोडेंसेंही वागण्याचें नाकारलेंत, तर बाबांचा क्रोधाग्नि आपलें प्रेम जाळून—

कचः—नाहीं ! देवयानी, तसें नाहीं. तुझ्या बाबांच्या क्रोधाचा वडवानल तुझ्या व माझ्या प्रेमाच्या सागराचे पोटांत बुडी मारून दडून राहील.—देवयानी, तूं मला विनंति करण्यापेक्षां तुझ्या बाबांच्यापाशीं हट्ट धरून बैस—

देव०:—महाराज, बाबांच्या हट्टी स्वभावाची ओळख आपणांस अद्याप पटलेली नाहीं. महाराज, असह्य वियोगाची भीति मजकडून हें बोलवीत आहे. मी दुःखीकष्टी असलें म्हणजे आपणही आपोआप दुःखीकष्टी होतों, मी आनंदी असलें म्हणजे आपणही सर्व काळजी विसरून जाऊन आनंदी होतां, म्हणून विनंती करितें, मजवर वियोगाचें दुःख सोसण्याचा प्रसंग—

कचः—मी होऊन कसा आणीन ?—देवयानी, माझ्या सहवासांत तुला सुख कां वाटतें ? सांग पाहूं ?

देव०:—माझ्या सहवासांत आपणांला सुख वाटतें, म्हणून आपल्या सहवासांत मला सुख वाटतें. महाराज, माझ्या सहवासांत अपणांला सुख कां वाटतें बरें ?

कचः—मूर्तिमंत सुखाच्या सहवासांत कोणाला सुख वाटणार नाहीं ? देवयानी, तूं माझ्या गाण्याची तारीफ करतेस खरी, पण तुझ्या कोकिलस्वांत आपला सूर मिसळतांना मी शरमलों पाहिजे, ही माझ्या गाण्याची किंमत आहे; तुझा नाजूक हात हातांत धरितांना, फुलांच्या कोमल पाकळ्या लोखंडी कांबीच्या दावांत चुरडल्या जातील कीं काय, अशी धास्ती वाटून मी माझा हात मागें घेतों, ही माझ्या रूपाची स्थिति आहे. देवयानी, तुझ्यासारख्या सुकुमार कळीनें वज्राच्या सान्निध्यांत कां बरें सुख मानावें ?

देव०:—महाराज, आपल्या सहवासांत कोणाला सुख वाटणार नाहीं ?

पद २१. राग जिल्हा झिंजोटी, ताल केरवा.

[ " ढोलत आये मोरि नैया " या चालीवर. ]

डोलत जीव देवकाया देखोनिया तव ॥ ध्रु० ॥
ही देवकाया अहो कीं जीवमाया !

लाज उपजे, मी नच साजें
याचि पाया; कांति नवोनव ॥ १ ॥

आपलें रूप अप्सरांनाही लाजविणारें आहे,—हो, आहेच तसें.—पुरुषांना स्वतःच्या रूपाची तारीफ बायकांप्रमाणें आवडत नाहीं असें म्हणतात,—पण आपलें रूप आहेच तसें.—शिवाय महाराज, आपण वृषपर्व्यांचे शत्रूच्या गोटांतील असूनही माझें प्रेम प्रथम संपादन करून, त्या प्रेमाच्या जोरावर संजीवनी विद्या हरण करावयाला तयार झालां,—आपला हा करारी, निश्चयी, व धाडसी स्वभाव स्त्रीजातीला अंकित करावयाला पुरेसा नाहीं काय ?

कचः—देवयानी, आतां मात्र तूं खरें खरें बोललीस. माझ्या निश्चयी धाडसाच्या पायावर तुझ्या प्रेमाचें मंदिर उभारलेलें आहे; आणि मला पक्कें माहीत आहे, करारी बाण्यावर पाणी सोडण्याबरोबरच लाम तुझ्या प्रेमालाही आंचवावें लागेल !—मीं जर एक वेळ माझें ब्रीद सोडलें, तर तुझ्या प्रेमाचें मूळच नाहींसें होईल; आणि मग माझ्या सहवासांत तरी तुला सुख कोठून होणार ? लाडके, तूं जो संयोगाचा मार्ग सुचवीत आहेस, त्या मार्गानें मी एक पाऊल जरी गेलों, तरी तुला न कळत तुझें प्रेम उलट मार्गानें जाऊं लागेल; प्रेमाच्या ह्या कायमच्य फारकतीपेक्षां—

देव०:—उद्यांचा वियोग आपणांला बरा वाटतो ना ?

कचः—देवयानी, उद्यांचा वियोग फार वेळ टिकणारा नाहीं. तुझें प्रेम संपादन करून संजीवनी विद्येची प्राप्ति करून घेण्याकरितां माझ्या पित्यानें व देवेंद्रानें मला येथें पाठविलें. देवयानी, तुझ्या प्रेमाला मी पात्र झालों, त्या वेळीं मी स्वतःस परमभाग्यवान् समजलों; पण तुझ्या

पित्याचे हट्टी स्वभावामुळें प्रेमाच्या सुखद मार्गानें तुझी व संजीवनी विद्येची प्राप्ति मला होईल असें दिसत नाहीं.

देव०:—मग आपण माझा व संजीवनी विद्येचा नाद सोडून देणार काय ?

कचः—नाद कां सोडून देईन ? सोप्या व आरामाच्या मार्गानें तुझी व संजीवनी विद्येची प्राप्ति विधात्यानें माझ्या कपाळीं लिहिलेली नसली तरी, तपश्चर्येचा घोर मार्ग मला कोणीं बंद केलेला नाहीं ! तुझ्या व संजीवनीच्या प्रातीसाठीं मीं माझें ब्रीद कशाला टाकिलें पाहिजे ? ब्रीद राखून खडतर तपश्चर्या करणारांना प्रसन्न होण्याचें आपलें व्रत जोंपर्यंत शंकर भोलानाथ पाळीत आहेत, तोंपर्यंत तुझ्या बाबांच्या रागाची पर्वा करण्याचें किंवा तुझा नाद सोडण्याचें मला कारण नाहीं. शंकर भोलानाथ ही देवता तुझ्या पित्याप्रमाणें पक्षपाती नाहीं; स्वतःच्या कार्याकरितां भक्तांच्या भक्तीचा उपयोग करून घेण्याची इच्छा त्या ज्ञानेशाच्या ठिकाणीं नाहीं; किंवा तपस्व्याला स्वतःच्या तपाची किंमत माहीत नाहीं म्हणून शक्तीचा किंवा ज्ञानाचा एखादाही कण कमी देण्याची प्रवृत्ति त्या महेशाच्या ठिकणीं नाहीं; तो महेश माझा पाठीराखा आहे.—

पद २२. राग भूप, ताल त्रिवट.

[ " इसरे जोबनदा " या चालीवर. ]

अनाथ-नर-तपा तारक भोला ।
मारक नच तो झाला ॥ ध्रु० ॥
निज-पर-भेदा तो ना मानी ।
काल देश हे मनिं ना आणी ।
तपोबलानें हो वश सकला ॥ १ ॥

तो शंकर भोलानाथ तुझ्या बाबांना तेवढा प्रसन्न करतां आला, आणि मला प्रसन्न करतां यावयावचा नाहीं, असें का तुला वाटतें ? देवयानी, स्वतःच्या तपश्चर्येच्या लायखीनें पार्वतीपरमेश्वराच्या–सर्व ज्ञान्यांच्या मातापितरांच्या–निःपक्षपाती, न्यायी व निर्भेळ अशा ज्ञानसत्रांत हजर राहून, संजीवनी विद्येचा हुंडा तेथेंच अगाऊ घेऊन, नंतर देवयानी, तुझ्या प्रेमाचें सुख उपभोगण्याकरितां मी येथें येणार आहें. म्हणून म्हणतों देवयानी, तपश्चर्येच्या दुसरा मार्ग–मग तो दुर्धर आणि दुःखाचा का असेना–मोकळा असतांना, मी माझ्या व्रीदापासून तरी कां ढळूं ?–देवयानी, तूं तुझ्या बाबांना आतांच जाऊन सांग, सरस्वतीपूजनाचा समारंभ पाहण्याकरितां उद्यां त्यांनीं येथें येण्याची कांहींच जरुरी नाहीं. कारण,—

**पद २३.** राग सोहनी ताल त्रिवट.

[ " काहे अब तुम आये " या चालीवर. ]

मद्य-वपु-घट लत्ताप्रहारें फुटत हे,
रुधिरसम मत्तमद वाहे, न भू भार साहे ॥ ध्रु० ॥
मधु-वध-कुपित समर जरि गुरुवर करी घोर,
विगतविजय कच नोहे ॥ १ ॥

[ मद्याचे कलश लाथाडून जातो. ]

देव०:—मला वाटलें होतें, हे असे रागावले म्हणजे माझा जीव त्यांच्या जिवाशीं भांडून आम्ही एकजीव होणार नाहीं; पण माझ्या अनुभवाला आलें, यांच्या सर्व लहरींचे, यांच्या सर्व विकारांचे, यांच्या सर्व विचारांचे, व यांच्या सर्व आचारांचे कौतुक आणि अनुकरण करण्यापलीकडे मला दुसरें तिसरें कांहीं जीवितच नाहीं ! कचदेवा, तुमच्या

निश्चयी क्रोधानें मला या वेळीं पुरें जिंकलें असून, देवेंद्राला जें यश मिळालें नाहीं, त्या यशाची माळ मी तुमच्या गळ्यांत आतां घालीत आहें.

पद २४. राग मांड झिंजोटी, ताल दादरा.

[ " जरा बोलो सावरिया " या चालीवर. ]

कविबाला वरुनिया राजा भुवनिं या कच झाला ।
भुलवो फिरवो अहो मोहें हा मानिनितनमनाला ॥ ध्रु० ॥
कच जय पावे, दे भयाहि गुरुमना ।
द्या हो रमणा अशा वशीकरणा ॥
कां न शिकवि तीच कला, नाथा, मजला ।
मज दे प्रेमा, प्रीतिकला हो विमला ॥ १ ॥

[ जाते. ]

अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

[ वृषपर्वा बसला आहे; सेनापति जवळ उभा आहे. ]

वृष०:—अजून युवराज आले नाहींत ?

सेना०:—आतां इतक्यांत येतील महाराज.

वृष०:—शर्मिष्ठा तरी आली का ? देवयानीकडचा समाचार तिनें आणला का ?

सेना०:—आतां इतक्यांत येतील.— आज सरकारस्वारी इतकी उदास कां ?

वृष०:—नित्यनियमाप्रमाणें गुरुमहाराजांचे दर्शनाला गेलों असतांना दर्शन न घडतां आयुष्यांत प्रथम आजच परत यावें लागलें ! देवयानीच्या काळजीनें आचार्य दुःखीकष्टी झाले असून तिची समजूत करीत बसले आहेत; तेव्हां आज कोणालाच दर्शन व्हावयाचें नाहीं, असें मला समजलें. दुर्दिनामुळें सूर्याचें दर्शन घडलें नसतां जसें सर्व विश्व निस्तेज होतें; त्याप्रमाणें आज माझें मन गलितधैर्य झालें आहे. माझ्या सत्तेपुढें पळ काढतांना देवेंद्रालाही जितकें वाईट नाटलें नसेल, तितक्या दुःखी अन्तःकरणानें मीं गुरुदेवतेच्या मंदिरांतून पाय काढला !

सेना०:—गुरुकन्येला असा रोग तरी कोणता झाला आहे ?

वृष०:—कचाशिवाय दुसरा कोणचा रोग देवयानीला होणार ?—या रोगानें देवयानीलाच पछाडलें आहे असें नव्हे, तर माझ्या सर्व वैभवालाच यानें ग्रासलें आहेसें वाटतें ! कचानें काल मद्याचे कलश लाथाडले, आणि आज देवयानीनें आंथरूण धरलें. कचाला हाकलून लावावा म्हणून गुरुदेवतेपाशीं विनंती करायला गेलों, तों त्यांचें दर्शन न झाल्यामुळें मला कचानेंच चपराक लगावल्यासारखें झालें आहे ! कचाचा पगडा देवयानीवर न असतां, सौंदर्यबलानें देवयानीच कचाला आपला गुलाम बनवील, अशी मला आशा होती—( पद्यांत " शरण तुज देवयानि रिघत कच तो जाण; " ) हो, हीच मला आशा होती. मला वाटतें, माझी ही आशा सुवार्तेचें पाणी शिंपून पुन्हा टवटवीत करण्याकरितां देवयानीकडून शर्मिष्ठा आली असावी. [ शर्मिष्ठा येते. ]

शर्मि:०—

पद २४. राग पहाडी–मांड, ताल नकटा.

[ " बालम कुच रोटि लेवो " या चालीवर. ]

शरण तुज देवयानि, रिघत कच तो जाण;
तपा जिंकी, विभवा जिंकी, तृणवत सदा सुर मान ॥ ध्रु०॥
बला नच वरी, अरी निवारी, असा सुरहि धरी भाव;
तेजेंहि तेजा न देहीं मिळवितां, पावे मरण कविनांव;
दिसे कविसुता, मला सुररता, प्रेमेंहि प्रेमा हरिल निजप्राण;
मज अजि धांव तूं पाव; नृपा अससि तूं त्राण ॥ १ ॥

बावा, कचाचा नाद सोडून द्यावयाला मीं देवयानीला सांगितलें, तेव्हां आतांचें हें गाणें मीं म्हणून दाखविलें; पण ती म्हणाली,

कांहीं तरी महत्कार्य कचाचें हातून व्हावयाचें असून, असल्या महात्म्याचा योगक्षेम चालविण्याचें परमेश्वरी पुण्य मला मिळत असतां, त्या पुण्याचे आड तुम्ही कां येतां ?

वृष०:—देवयानीचा हा रोग असाध्यच आहे.– युवराजानें आचार्यांचे पायांजवळ कांहीं विनंती केली नाहीं काय ?

शर्मि०:—कचाला हाकून देण्यासंबंधानें दादानें विनंती केली, त्या वेळीं मूर्च्छा येऊन पडूं लागलेल्या देवयानीला सावरून धरून आचार्य म्हणाले, हिच्या बरोबर माझीही जीवज्योती मावळूं लागते. देवयानी जरा सावध होऊं लागली असें पाहून, चल पुढें हो, मीच अधिराजांकडे येतों, असें गुरुमहाराज पुटपुटले, व इकडे यावयाला निघाले.—ते पहा, आचार्य, दादा, सर्वजण आलेच.

[ शुक्राचार्य, युवराज व नोकर प्रवेश करितात. ]

वृष०:—गुरुमहाराजांचा जयजयकार असो ! या आसनाला आचार्यांनीं सनाथ करावें.

शुक्रा०:—अधिराज, आपली पूजाअर्चा ग्रहण करून आपल्या सहवासांत आनंदांत कांहीं काल घालविण्याकरितां मी आलेला नाहीं ! अधिराज, कचाला हांकून द्यावयाला मी तयार असलों तरी, माझा शब्द खरा करून दाखविण्याचा हट्ट आपण आणखी एक वर्ष धरूं नका, असली गुरुदक्षणा मागण्याकरितां मी आलों आहें.– अधिराज, तरुणपणीं स्त्रीप्रेम झुगारावयाचें जसें जिवावर येतें, त्याचप्रमाणें वृद्धापकाळीं अपत्यस्नेहाचे एकाही धाग्याला जरा धक्का लागला तर,ज्या बंधनांनीं जीव शरीरांत

बांधला गेलेला असतो, ते सर्व बंध एकदम निष्ठुरपणें कोणी तोडतो आहे कीं काय, असें वाटून प्राणोत्क्रमणाचे वेळच्या यातना मनाला होतात! अधिराज, अपत्यस्नेहाचा महिमा आपणांस विदित आहेच!

पद २५. राग विहाग, ताल त्रिवट.

[ " राजनके राजा महाराजा " या चालीवर. ]

हो तनय काल महाकाला, यमवध केला
नाशवंत तरतनुनें, ही सुतलीला ॥ ध्रु० ॥
मृत जनक जाई सुतदेहीं, नव गेहीं;
तनुजा तेविं अमर करी स्वकुलाला ॥ १ ॥

देवयानीच्या अपत्यस्नेहाला बळी पडून, कचाचा कालचा अपराध मीं पोटांत घातला आहे, आणि कचाचें मन बदलण्याकरितां एक वर्षाची मुदत मीं देवयानीला दिली आहे.

वृष० व युव०:—एक वर्षाची मुदत फार होते.

शुक्रा०:—मनाचे रोग बरे करण्याला सूर्यचक्राचे एका फेऱ्याची मुदत अवश्य असते. या अवधींत कच तरी स्वकीयांवरील भक्तीचे धागे तोडील, देवयानी तरी पतिप्रेमाचे धागे तोडील, किंवा हा शुक्र तरी अपत्य-स्नेहाचे धागे तोडील. राजा, माझे आश्वासनावर विश्वास टाकून आपण निष्काळजी राहण्यास हरकत नाहीं. एक वर्षाचे अवधीला अधिराज—अनुकूल नसले तरी—निदान प्रतिकूल नाहींत, असें सांगून देवयानीचें सांत्वन करण्यास मला आतां जाऊं द्या. [जातो.]

वृष०:—आणखी एक वर्षभर आमची ग्रहदशा पालटत नाहीं म्हणावयाची!

युव०:—न पालटायला काय झालें ? आकाशांत ग्रह जर मठ्ठपणानें एकाच राशीवर वर्षांनुवर्षे बसून राहिले, तर कर्त्या पुरुषांनीं मुष्टिमोदकांचा रतीब त्यांना लावून, पाहिजे तितक्या जलद ग्रहचक्र फिरविलें पाहिजे. ग्रहाप्रमाणें आम्हीं फिरतां कामा नये, तर आमच्याप्रमाणें ग्रहांनीं फिरलें पाहिजे,—ग्रहदशा पालटत नाहीं ?—तुम्ही उलटा म्हणजे ग्रहही उलटे-पालटे होतील !

वृष०:—पण गुरुभक्तीला बट्टा लागेल !

युव०:—आचार्यांचे पट्टशिष्य आपण आहां; तेव्हां आचार्यांच्या कृतीचें अनुकरण करूनच आपली भक्ति आपण या वेळीं व्यक्त केली पाहिजे. अपत्यस्नेह आचार्यांचे ठिकाणीं तेवढा दिसावा, आणि त्यांच्या पट्टशिष्यांचे अंगीं त्यांतला लवलेशही असूं नये हं ? देवयानी जशी आचार्यांच्या रक्तमांसापासून उत्पन्न झाली, त्याप्रमाणें मी व शर्मिष्ठा आपणांपासूनच जन्मास आलों आहों ना ?—आम्हांला कोंडा देऊन तर विकत घेतलेलें नाहीं ना ?

वृष०:—बाळा, असें मर्मभेदक कां बोलतो आहेस ?

युव०:—महाराज, स्वतःच्या पिलांवर पशुपक्षी आदिकरून सर्व प्राणी ममता करितात; हा शरीरधर्म सोडून देणें योग्यांनाही मुष्किलीचें असतें. तपस्व्यांतले तपस्वी म्हणून नांवाजलेले शुक्राचार्यही देवयानीवर ममता करितात; पण संसाऱ्यांतले संसारी म्हणून प्रसिद्ध असलेले वृषपर्वा महाराज, यांना मात्र आपल्या मुलांमुलींची कांहींच काळजी वाटत नाहीं ! देवयानीचें कांहीं काळ मनोरंजन करणें, एवढ्याच नाटकी प्रेमानें कचाला जर संजीवनी विद्या प्राप्त व्हावयाची असली, तर कित्येक तपें आचार्यांची शुश्रूषा आपण कशाला केलीत ? देवयानीला फूस लावून पळवून नेण्याबरो-

बरच आमचें हें वैभव जर कच लुबाडून नेणार असला, तर इंद्राशीं युद्ध करून विश्वांतील सर्व सुखसाधनें आमच्या ह्या नगरींत एकवटण्याचा एवढा अट्टाहास आपण कां केला ?

वृष०:—माझें वैभव व माझी प्रतिष्ठा तुम्हांकडे अव्याहत चालावी, असें मला कां वाटणार नाहीं ? तुमच्या मार्गांतला कचाचा कांटा उपटून टाकला पाहिजे हें मला समजतें; पण आचार्यांनीं एक वर्षभर कचाला येथें पुन्हा ठेवून घेतलें त्याला मी काय करूं ?

युव०:—काय करूं ?—काय करूं ! काय करावयाचें तें मला चांगलें समजतें, आणि संधि साधून तें मी करूनही टाकणार आहें. आज माझी एवढीच विनंती आहे, गुरुमहाराजांच्यापुढें जेव्हां माझ्या कृतीची चौकशी होईल, त्या वेळीं आपण आपल्या अपत्यस्नेहास जागण्यास चुकूं नये. [ जातो. ]

वृष०:—हं ? हा असा एकदम निघून गेला ! कांहीं तरी भयंकर कल्पनेच्या वादळाचें काहूर याचे मनांत माजून राहिलें असलें पाहिजे ! चल शर्मिष्ठे, चल; त्याला बोलावून आणून त्याच्या मनांतले गुप्त बेत समजून घेतले पाहिजेत. [ जातात. ]



## प्रवेश दुसरा.

[ सेनापति व युवराजांचे सरदार प्रवेश करितात. ]

**सरदारः—**

पद २६.

[ बँडचे चालीवर. ]

मांसा तैसे रुधिरा, मानूं आम्ही मदिरा,
प्राणचि आम्हां दारू, माता कांता मारूं ॥ ध्रु० ॥
येतां जातां प्यालों, अजिंक्य चैनी बनलों,
आज्ञा आम्हां बोलो, माता कांता मारूं ॥ १ ॥
सच्चे सेवक सारे, मदिरेचे हे प्यारे,
देवा धर्मा विसरे, माता कांता मारूं ॥ २ ॥

**सेना०:—**मीं मघाशीं आज्ञा केल्याप्रमाणें मधुवनांत तुम्ही गुप्तपणें संचार करा; युवराजांची आज्ञा होतांच मी खूण करीन, मग लगेच आपलें कार्य ठरल्या पद्धतीनें उरकून टाका !



## प्रवेश तिसरा.



**स्थळः—शिष्यवराचें मंदिर.**

[ शिष्यवर, रसिका, मधुकर व इतर स्नेही बसले आहेत असा देखावा. ]

शिष्य०:—रसिकादेवी, व इतर मित्रमंडळीहो, आज तुम्हां सर्वांन या मंदिरांत येण्याची कां तसदी दिली, हें थोडक्यांत सांगतों. देवयानीच्या पाणिग्रहणाकरितां मजसंबंधीं युवराज खटपट करीत आहेत, हें आपण सर्वांस विदित आहेच. पण इतरांच्या उद्योगानें प्राप्त झालेली बायको स्वत:ची टिकूं शकत नसते, अशी जबरदस्त शंका आल्यामुळें स्वत:च्या अक्कलहुषारीवर देवयानीला मिळविण्याचा उपक्रम मीं आरंभिला आहे. विश्वामित्र व आमचे शुक्राचार्य यांनीं विधात्याचे सजीव सृष्टींत ढवळाढवळ करण्यास तपोबलानें आरंभ केला; विश्वामित्र स्वत:च्या मंत्रानें मनुष्य-प्राणी निर्माण करूं शकतो, तर आमचे आचार्य स्वत:च्या मंत्रानें मेलेला प्राण पुन्हा परत आणतात; म्हणजे जन्म आणि मृत्यु या दोन्ही प्रसंगां-संबंधानें या दोन महात्म्यांनीं विधात्याचे नियम झुगारून दिले. सजीवांत फेरफार करून यांनीं नांव मिळविलें तर निर्जिवांवर—जड पदार्थांवर—हुक-मत चालवून मीं श्रेष्ठ पदाला चढणार! एरवीं सासऱ्याहून जावई मोठा होणार नाहीं ! हें माझें कर्तृत्व देवयानीच्या लक्षांत येण्याकरितां मदिरा-मंदिराचा एक नमुना मीं तयार केला आहे. हा पडदा स्वत:च्या हातांनीं दूर करून मीं स्थापिलेल्या मद्यालयाचें दर्शन श्रीमती रसिका देवीनें सर्वांस द्यावें, अशी या समयीं माझी त्यांना विनंती आहे.

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच ! इतकें बोलून मी पुरें करितों.

रसि०:—( पडदा दूर करीत करीत ) श्रीमान् पंडित शिष्यवर, आपल्यासारख्या विद्वद्रत्नानें माझा जो हा बहुमान केला, त्याबद्दल आभार मानून मी हें मदिरालय उघडण्याचें काम करितें.

पद २७. राग झिंजोटी, ताल केरवा.

[ " रंग उडावत ले चलोरे भैय्या " या चालीवर. ]

देव सुरालय हें पाहुनियां
वंदिति मोहित शोधकपाया ॥ ध्रु० ॥
मांसल गिरि हा प्रसवित मदिरा,
वाहिनि मादक-तोषद-तोया ॥ १ ॥

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच ! सर्व मंडळींनीं ह्या मद्यालयांत शिरून मद्यप्राशनास प्रारंभ करावा.

शिष्य०:—थांबा, इतक्यांत नाहीं. ह्या मद्यालयाचें नांव मंदिरापीठ ऊर्फ दारूपोई असें मीं ठेवलें आहे; आणि असें करण्याचें कारणही तसेंच आहे. विधात्यानें मोठमोठे पर्वत निर्माण केले, मोठमोठे समुद्र निर्माण केले, मोठमोठ्या नद्या निर्माण केल्या; पण मांसाच्या पर्वतांतून निघणारे, मसाल्याच्या वाळूंतून वाहणारे, व मद्योदधीला मिळणारे दारूचे पाट झुळू झुळू वाहतांना कोठेंही दृष्टीस पडत नाहींत ! जें विधात्याला साधलें नाहीं, तें ह्या शिष्यवरानें आज प्रत्यक्ष करून दाखविलें आहे.—माध्वी दारूची ही नदी, गौडीची ही, ही गंधोत्तमा, व हा सर्व तऱ्हेच्या मदिरांचा सागर !

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच !—विद्वान् व कल्पक लोक दारूबाज झाल्यानें देवांच्या घरींही दृष्टीस न पडणाऱ्या ह्या असल्या सोई

जगाच्या दृष्टीस पडतात !—चला आतां ह्या सागरांतलें तीर्थ पिण्यास प्रारंभ करूं या.

शिष्य०:—थांबा ! अजून थोडा वेळ थांबा.—मित्रमंडळीहो, तुम्ही आचार्यांचें मदिरामंदिर किंवा युवराजांचें मद्यालय पाहिलें असेल; पण ह्या दारूपोईची बरोबरी कोणाचेही हातून होणार नाहीं. जनावरें ज्याप्रमाणें पाणी पितात, त्याप्रमाणें तोंड लावून ओठानें दारू पितां यावी, अशी योजना ह्या विश्वकर्म्यानें येथें केली आहे. श्रीमती रसिका देवीसारख्या नाजुकांना करपल्लवही हालविण्याची तसदी पडूं नये म्हणून, दारूच्या नळ्या मुखकमलांत सोडण्याची व्यवस्था केली आहे !

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच !—आम्ही नाजूक नाहीं, आम्ही तोंड लावूनच दारू पिऊं.

शिष्य०:—मधुकरा, माझ्या दारूपोईतील पशुवृत्तीचा पहिला आनंद तूं लूट.—( मधुकर तसें करूं लागतो. ) या, जगांतील सर्व बलाढ्य दारूबाजांनो, या; आणि मद्यप्राशनाची आपली पखाली तहान ह्या माझ्या दारूपोईत शमवून घ्या !—थांबा ! रसिकादेवी, थांबा; तुमच्याच तरतुदीला मी लागलों आहें.—ह्या दारूपोईची कल्पना ह्या मस्तकांतून निघाली आहे; तेव्हां माझ्या मस्तकपर्वतांतून निघणारा दारूचा धबधबा आपल्या मुखकमलांत आदळतो आहे, असें आपणांस आज वाटणें इष्ट असल्यामुळें, मी चालती-बोलती दारूपोई आतां होतों. ( डोक्यावर दारूचें भांडें घेतो, त्याच्या नळ्यांतून दारू पिऊं लागतात. ) देवांनो, विमानांत बसून चालत्या-बोलत्या दारूपोईचा चमत्कार पाहण्यास या ! शुक्राचार्य किंवा वृषपर्वा यांची भीति तुम्हीं या वेळीं बाळगावयास नको ; कारण आचार्य किंवा अधिराज कोणीही जरी येथें आले, तरी या दारूपोईत इतके दंग

होऊन जातील कीं, इतर विषयांकडे लक्ष देण्यास त्यांना फुरसतच मिळणार नाहीं !

पद २८. राग कामोद, ताल एक्का.

[ " ऐसा तूं मी कोन जानत हूं " या चालीवर ]

वाजे गाजे माझा या भुवनिं महिमा,
गुणिजनवर रसिका गाई मम नामा ॥ ध्रु० ॥
गगनिं जैसा तृषित चातकांना, बहुसुख
दे जलधर, मम नव करणी तैशी मधुपांना ॥ १ ॥

[ सेनापति येतो. ]

सेना०:—देवयानीकडे आपणांस घेऊन जाण्याकरितां युवराजांनीं मला पाठविलें आहे.

शिष्य०:—अहो ! या वेळीं देवयानीलाच येथें तुम्हीं आणावयास पाहिजे होतें !—दारूला लाथाडणारा कच कोणिकडे आणि दारूला मस्तकावर नाचूं देणारा हा शिशीधर कोणीकडे, हें तेव्हांच तिच्या लक्षांत आलें असतें ! व ह्या दिव्य दारूपोईची मालकीण होऊन बसण्यास देवयानीही रसिका-देवीप्रमाणें राजी झाली असती.

सेना०:—देवयानी आपली होण्याची संधि आली आहे; तेव्हां आपण तातडीनें युवराजांकडे चलावें.

शिष्य०:—यायचीच संधि ! दारूपोईचा शकुनच तसा आहे !—हें मंगलकार्य असेंच मस्तकावर धारण करून येऊं का ?

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच. दारूपोईचें आणि शिशीधरांचें आतां कायमचें लग्न लागलें ! डोक्यावरील अर्धांगीला सदोदित तशीच बाळगण्यानें आपण गंगाधराप्रमाणें सर्व दारूबाजांना वंद्य झाला आहां

सेना०:—वेळ व्यर्थ गमवतां कामा नये! (भांडें उतरून) राहूं द्या हें येथें; चला आतां मजबरोबर युवराजांकडे. [जातात.]

रसि०:—चला, आपणही सर्व युवराजांकडे जाऊं.

[जातात व पडदा पडतो.]



## प्रवेश चवथा.



[रसिका व मधुकर येतात.]

मधु०:—रसिके, तुमचें आमचें काय काम आतां युवराजाकडे आहे?

रसि०:—देवयानीला वश करण्याची कोणची मसलत काढली आहे, तें तरी समजेल!

मधु०:—हं! त्यांत कांहीं अर्थ नाहीं. अग मी फुकट्या आणि तूं फुकटी! हंला हं करून चैन करण्याचा आमचा धंदा. खोल मसलतींत आपण कशाला पडा?—चल, परत चल; शिष्यवरानें निर्माण केलेल्या मदिरामंदिरांत आपण यथेच्छ आहारविहार करूं.

रसि०:—युवराज व शिष्यवर हजर असल्याशिवाय आपण फुकट्यांनींच मालकी गाजविणें ठीक नाहीं!

पद २९. राग सिंधभैरवी, ताल त्रिवट.

[" तिखे नैन चितबर, या चालीवर "]

धनवरविरहित सुख फुकट मान, युवराज
देत सौख्यदान, मजसि समज भाग्यवान

धनिक प्राण ॥ ध्रु० ॥
मद्य तेंवि धन मादक मोहन, धनिकविरह
मज मरण जाण ॥ १ ॥

मधु०:—अग, जगांतील सर्व चैनीचे खरे मालक आम्ही फुकटे !

पद ३०. राग सारंग, ताल केरवा.

[ " हमदम देके " या चालीवर. ]

नवरसपानसौख्य फुकट्याचें,
धनपति होति इतर नच साचे ॥ ध्रु० ॥
सेवि सुखाला, ना दे मोला,
यासि वदे विधि भाग्य नराचें ॥ १ ॥

[ जातात. ]



## प्रवेश पांचवा.



स्थळ—मधुवन.

[ देवयानी हार घेऊन प्रवेश करिते. ]

देव०:—फुलें तोडतां तोडतां कचदेवांची व माझी ही अशी कशी चुकामुक झाली ! आतां इतक्यांत ते येथें उभे होते आणि आतांच कसे दिसेनासे झाले ! प्रियकराचे मुखकमलाकडे एकसारखें पहात रहावयाचें सोडून देऊन, फुलांच्याकडेच अधिक लक्ष मीं दिलें, म्हणून कचदेव

रुसून दूर गेले असावेत ! छे ! तसें नव्हे. रुसून गेले नाहींत. मीं त्यांना सांगितलें होतें, मधुकर ज्या फुलावर बसलेला नाहीं असलेंच तेवढें फूल माझ्याकरितां तोडा, आणि येथें तर प्रत्येक फुलावर मधुकर बसलेलाच दिसतो; म्हणून ते दूर गेले असावेत. पण काय चमत्कार ! हे मधुकर फुलांना विरहांत टाकून दूर कां चालले बरें !

पद ३१. राग देस-सोरट; ताल एक्का.

[ " पियाकरधर देखो धरकत है मोरि छतिया " या चालीवर. ]

मधुकर वनवन फिरत करी गुंजारवाला,
भोगि पुष्पमाला, अभिनव कुसुम मधुपा
सहज सुचविति नूतन शृंगाराला ॥ ध्रु० ॥
भ्रमर सुरस वनिं दिसला कमला टाकुनि,
कच अदय भयद झाला, कोमजलें सुमनदल,
दुखवि मजला ॥ १ ॥

कचदेवा, माझ्या सुखासाठीं या मधुकरांना फुलांवरून कां बरें उठवितां !- मधुकराच्या वियोगामुळें कोमेजून गेलेलीं हीं फुलें पाहिलीं कीं, माझ्या मनांत चर्र होतें ! दुसऱ्याचा वियोग करणारांचे कपाळीं संयोग नसतो.—हे कायहो कचदेवा, मी सांगतेंना तुम्हांला, अशा रीतीनें मधुकराच्या आनंदाचे आड येऊन तोडलेलें एकही फूल मी वेणींत घालायची नाहीं ! [ पडद्यांत—मधुकरांनों, जरा दूर व्हा; ज्या कमलांवर तुम्ही गुंजारव करीत नाहीं, असलेंच तेवढें कमळ तोडण्याची देवयानीनें मला आज्ञा केली आहे.] हें काय बरें कचदेवा ! तुम्ही आपण होऊन मधुकरांना दूर व्हावयाला नका गडे सांगूं. दूर व्हावयाला सांगितलें काय, आणि हाकून दिलें काय, सारखेंच ! प्रेमाचा बिघाड नाहीं कां होत !—मग फुलें कोठून आण

म्हणतां ? न मिळायला काय झालें ? हीं पहा, आपणांकरितां मीं किती तरी गोळा केलीं आहेत !—नकाहो, सख्या नका; या मधुकरांना तुम्ही माझ्याकरितां त्रास देऊं नका; अपशकून होतो ना ? [ कच येतो. ]

कचः—ह्या मधुकरांना फुलांवरून मीं खरोखर उठविलें नाहीं.—तुझ्या आज्ञेप्रमाणें मी वागलों, म्हणून तर एकही कमल मला तुझ्याकरितां तोडतां आलें नाहीं. देवयानी, मधुवनांत तर असें एकही फूल नाहीं कीं, ज्यावर मधुकर गुंजारव करितांना दृष्टीस पडत नाहीं. सर्व कळया अशा रीतीनें प्रेमबद्ध झालेल्या मला दिसल्यामुळें, तुझ्या केशकलापांच्या भ्रमरांना अर्पण करण्याकरितां कोणचेंच कमल मला सांपडलें नाहीं !

देव०:—तुमच्या मनांत खरें खरें प्रेम नाहीं, मग फुलें कोठून सांपडणार ? खरें खरें प्रेम मनांत असलें म्हणजे, फुलें आम्हांला पाहून गालांतल्या गालांत हसूं लागतात; आणि तोडतांनाचा अंगुलिस्पर्श त्यांना लाडिकपणाच्या कुरवाळण्यासारखा वाटतो ! तुमच्या मनांत खरें प्रेम नाहीं, म्हणून मधुकरांनीं तुम्हांला फुलांना हात लावूं दिला नाहीं. तींच मला कितीतरी फुलें मधुकरांनीं आपोआप दिलीं !

कचः—तुझें बरोबर आहे. तूं जवळ गेलीस, म्हणजे मधुकर फुलाला सोडून तुझ्या मुखकमलावरच गुंजारव करूं लागतात, आणि मग मधुकरांना फसवून लागेल तितकीं फुलें तुला तोडतां येतात ! अग, रस चाखण्यास सोकावलेले ते भ्रमर तुझ्या अधरामृतावर उड्या टाकतील यांत काय नवल कारण हे पहा, माझ्यासारख्या नीरस तपस्व्याचें नांव मिळालेले हे कच—ते कुंतलभ्रमर गालावर चोरून हल्ला करूं पाहत आहेत ! ( देवयानी केशकलाप सांवरते. ) नको, त्यांना हातांनीं मागें लोटूं नको.—मधुकरांना मीं फुलांवरून उठवलें म्हणून का मला ही शिक्षा ?

पद ३२. राग पहाडी, ताल एक्का.

[ " जोबन मदभर चलि आई " या चालीवर. ]

लोळत कच मुखमधुवरि, त्यांसि तोंचि कर निवारि !
भ्रमरयोग कमलभोग, या धर्मा दूर न करि ॥ ध्रु० ॥
शिक्षेला कच न पात्र; देवयानि, तूंचि शपथ,
सफलकाम नलिनिनाथ दुखवि न वनिं कच यापरि ॥ २ ॥

अथवा देवयानी, असेच त्या कचांना दूर लोट; तुझ्या हस्तकमलांचा व कुंतलभ्रमरांचा असाच संयोग होऊं दे, म्हणजे एक तरी कमल भ्रमरां शिवाय या कचाचे दृष्टीस पडत राहील !

देव०:—असें कोणचें तें कमल ? तें आपल्या हातांत घेऊन मला नाहीं द्यायचें ?

कच:—देवयानी, तुझ्या हातांनीं तुझ्या मुखकमलावरचे भ्रमर दूर केले खरे, पण तें मुखकमल हस्तगत करण्याचा अधिकार मला नाहीं.

देव०:— अधिकार नाहीं म्हणण्यापेक्षां देवलोकींच्या भ्रमराला येथील कमल आवडणारें नाहीं, असें नको का म्हणावयाला ?

कच:—देवयानी तुजवरचें माझें प्रेम मीं किती वेळां बोलून दाखविलें आहे; मग प्रेमाची खूण एकमेकांस पटण्याकरितां मधुवनांतील ह्या भ्रमरांचें अनुकरण आम्हीं कशाला करायला पाहिजे ?

देव०:—महाराज, मी आपल्या प्रेमाची भुकेलेली आहें, हें मीं रुसून रडून हट्टाहट्टानें बाबांना सांगितल्यामुळेंच ना आपणांस एक वर्ष येथें राहण्याची परवानगी मिळाली ? काल, परवां माझें प्रेम गुप्त होतें; पण

आज-काल, ही देवयानी ह्या कचदेवांची दासी, असें सर्वतोमुखीं झालें आहे. बाबांना जी गोष्ट माहीत—किंबहुना आपणांस ठेवून घेऊन ज्या प्रेमास बाबांनीं पर्यायानें रुकारही दिला, अधिराज, युवराज, व सर्व सेना ज्या प्रेमाच्या कथा आपआपसांत कुजबुजतात, जें प्रेम आपल्या मुखांतून निघाल्यामुळें पवित्र झालें, त्या प्रेमाशीं आपण असे तिऱ्हाइतासारखे कां वागतां ?

कचः—देवयानी, ह्या प्रेमकथा खऱ्या आहेत, पण माझ्या पित्यानें कांहीं अटींवरच मला येथें पाठविलें; व एक वर्ष मला पुन्हां तुझ्या पित्यानें ठेवून घेतलें, तेंही कांहीं अटींवरच; हें तूं विसरूं नकोस. गांधर्व-विवाहाचे मंदिराकडे नेणारा प्रेममार्ग आक्रमण्याची मोकळीक तुला व मला नाहीं.

देव०:—जगजाहीर प्रेमी जोडपीं ज्या प्रेममार्गानें जाऊन इहपरलोकीं धन्य झालीं, तो मार्ग आम्हांलाच तेवढा मोकळा कां नसावा ?

कचः—देवयानी, प्रेमाचे भरांत तुझ्या पित्याच्या व माझ्या पित्याच्या अटी विसरूं नकोस. मी तुझ्या प्रेमाच्या आड येत नाहीं, तर त्या अटींची आठवण आड येत आहे.—तुझ्या प्रफुल्लित नेत्रांतून निघणाऱ्या सुखाच्या झोतांत गुरफटून जाऊन, प्रेममय जीवनरसानें अभ्यंगस्नान जरी ह्या वेळीं मी करीत असलों, तरी देवेंद्राचे सभेंत मीं केलेल्या प्रतिज्ञेची आठवण बुजून जात नाहीं, त्याला मी काय करूं ?—देवयानी, तुझ्या सहवासानें नवे विकार प्रबल झाले असले तरी, जुने विकार ह्या कचाचे मनांत निर्बल होणें शक्य नाहीं !—अनुभवलेल्या सुखदुःखांची व खांद्याला खांदा लावून केलेल्या प्रतिज्ञांची आठवण थोडा वेळ टिकणें, यालाच बुद्धीचा मंदपणा म्हणतात; आणि काल घडून आलेल्या

गोष्टी आजच्या प्रसंगाच्या स्वयंस्फूर्तीनें मनाचे आरशांत जर मूर्तिमंत उभ्या राहिल्या नाहींत, तर पशूंच्याच दावणीला बांधले जाण्यास आम्ही लायक होतों !—सांग, देवयानी, कालचा इतिहास आठवून सांग, उद्यांच्या रंगावर दूरदृष्टि फेंकून सांग, पितरांच्या बुद्धीनें, देवेंद्राच्या मनानें, व तपस्व्यांच्या मतानें तुझा पति बुद्धिहीन ठरलेला तुला आवडतों काय !—मी तर असलें बुद्धिमांद्य म्हणजे सर्व दुःखाचें माहेरघर समजतों.

पद ३३. राग बागेश्री, ताल त्रिवट.

[" ग म् ध " या सुरावर्तीचे चालीवर.]

मूढ दे बहु यमयातना, खरसम हो
अंकित जना, जगीं ॥ ध्रु० ॥
बहुनरवधपटुयमगदा लोकां देई मरण
एकदां; प्रेमा मंद क्षणाक्षणा ॥ १ ॥

देवयानी, हा असला एकांतांतील तुझा सहवास मला कितीही आवडत असला तरी, कालच्या आणि उद्यांच्या विचाराला न साजेलसें वर्तन माझ्या हातून आज होणें शक्य नाहीं.

देव०:—महाराज, कालचे व उद्याचे अडथळे प्रेमाला दिसतच नाहींत. कारण प्रेमापासून दूर अंतरावरही त्यांना थोडा वेळ देखील बसून राहतां येत नाहीं. आजच्या जोरावर भूत आणि भविष्य हे दोन्ही काल प्रेमाला हस्तगत करून घेतां येतात. आजचीं सुखें प्रेमामुळें अजरामर होऊन मृत्यूची भीति राहत नाहीं; इतकेंच नव्हे, तर दिवाळखोरांच्या नरकांतून सोडविणारी व पूर्वीच्या देण्याची फेड करणारी परंपरा आजच्या प्रेमापासून जन्मास येते; आणि भविष्यकाळच्या

कर्तव्याला जोम येऊन हेळसांडीला थाराच मिळत नाहीं.—महाराज ! प्रेम म्हणजेच भूत, भविष्य, व वर्तमान या तिन्ही काळांचा मूर्तिमंत संगम ! भूतकाळच्या सर्व सुखांचा संग्रह प्रेम आज करितें; भविष्यकाळच्या सर्व दुःखांचें निवारण प्रेम आज करितें. भूतकाळावरची दया म्हणजेच प्रेम; चालू कालचा धर्म म्हणजेच प्रेम; आणि भविष्य काळच्या कर्तव्याची दीक्षा म्हणजेच प्रेम! महाराज, परमेश्वर ज्याप्रमाणें तीन्ही कालांचा शास्ता आहे, त्याप्रमाणें हें प्रेमही तिन्ही कालांचें शासन करितें.

पद ३४. राग जिल्हाधानी, ताल दादरा.

[ " जाको सखि " या चालीवर. ]

जननि चलाचला प्रीति जीवकला;
लोल लोकां सूत्र असे अचला प्रीतिलीला.
प्रेमसखा उद्धरि जीवाला;
हा जन्मतांच ब्रह्मा साक्षात आला;
देवधर्ममहिमा धरि खरा प्रेमा;
तारण्या जगाला देव प्रीत झाला ॥ ध्रु० ॥
ईशाचे नामा–स्वरूपा–पहाया, मिळाया,
विशाल मार्ग सोपा प्रेम मला ॥ १ ॥

कचः—देवयानी, तुझ्या गोड शब्दांनीं वर्णिलेला प्रेमाचा हा महिमा कोणाला पटणार नाहीं ? परमेश्वराच्या विराट् स्वरूपांतील रसवर्ज उग्र सत्याकडे किंचितूही नजर वळविण्याचें धाडस निग्रही पुरुषांनाही होत नाहीं; तेव्हां तुझ्यासारख्या सतीच्या ठिकाणीं दिसणाऱ्या प्रेमस्वरूपी जनार्दनाचें गोड व मधुर दर्शन सामान्य जनतेनें नेहमीं घेत राहिलें पाहिजे.

पद ३५.

[" सांकल्पमे टीदो " या कानडी चालीवर. ]

तेजा नभिं ज्या साहवेना,
तें देइ मृदुला शोभा नयना ॥ ध्रु० ॥
सत्या कठोरा ज्या सोसवेना,
करि तेंचि तव मुख मधु मना ॥ १ ॥
बहु दुःख संसार, परि दे जनां
अति सौख्य साध्वीसंगें जाणा ॥ २ ॥

पण देवयानी, कार्यवशता रसिकांनाही नीरस करते; आणि कार्य जरी साधलें नाहीं, तरी मूढपणा पदरीं न पडेल अशी खबरदारी घेणें त्यांना भाग पडतें.

देव०:—महाराज, आपण प्रेमी ठरलां तर बुद्धिहीन व्हाल अशी भीतीच नको. प्रेम म्हणजेच खरी बुद्धिमत्ता! पशूंत कामविकार असतो, पण प्रेम नसतें. बुद्धि बुद्धि म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून, प्रेमाच्या व्यवहारांतल्या स्वरूपालाच बुद्धि म्हणतात.—अशा प्रेमानेंच जर आपलें हृदय या वेळीं व्यापलेलें आहे, अशा प्रेमामुळेंच जर या चरणांची निरंतरची दासी होऊन राहण्याकरितां मी हा हात आपणांला अर्पण करीत आहें—महाराज, माझ्या प्रेमाला दूर लोटूं नका! माझ्या प्रेमाचा असा हिरमोड करूं नका!—नाहीं, माझें प्रेम आपण कस्पटाप्रमाणें मानीत नाहीं; मी उगीच बोललें; क्षमा करा!—संजीवनी विद्येच्या अगोदर माझ्या हाताचा स्वीकार करतां येत नाहीं; पण महाराज, जगांतील हरएक कला व विद्या प्रेमाचींच बाह्य स्वरूपें नाहींत काय! ज्या स्वतःच्या शक्तीनें प्रेम स्वतःस अढळ करून घेतें, ती शक्ति म्हणजेच संजीवनी विद्या! प्रेमापुढें संजीवनी विद्येचा पाड काय? सृष्टि अन्याहत

चालते ती प्रेमाच्या संजीवनी विद्येमुळेंच. उलथापालथ करून स्वतःचा चुराडा करणाऱ्या पंचमहाभूतांच्या क्षोभापासून सृष्टीचें संरक्षण कसें होतें ? भयंकर झंझावातांत निःशंक संचार करून सृष्टि-क्षोभाला, चमकणाऱ्या चांदण्यांच्या शीतल सुहास्याचें स्वरूप प्रेम देतें; जीर्ण पाचोळ्यांतून सुगंधि कळ्या प्रेम फुलवितें; आणि वृद्ध मातापितर मृत्यूच्या मुखीं पडण्या-पूर्वींच मरणाकडे धिक्कारानें पाहणाऱ्या युवयुवतींचें जोडपें वृद्धांच्या गादीवर प्रेम बसवितें.—असल्या प्रेमापुढें संजीवनी विद्या म्हणजे काय पदार्थ ?—महाराज, आपल्या धर्मपत्नीचा हा हात स्वीकारावयाचा होता; आणि अखिल विश्वाला कळवावयाचें होतें कीं, प्रेमच सृष्टीचें मूळ आहे, प्रेमच सृष्टीचा आधार आहे, आणि प्रेमाकरितांच सृष्टि चालाव-याची आहे.

कचः—देवयानी, माझ्या मनांतलेच विचार तुझी वाचा ह्या वेळीं जरी बोलून दाखवीत आहे, तरी अशा रीतीनें मी तुझें पाणिग्रहण करूं शकत नाहीं. मी तुला इतकें वचन देतों, तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणच्याही स्त्रीला मी कधींही वरणार नाहीं.—तुझ्या प्रेमाचा विरस न होण्यास इतकें वचन पुरेसें नाहीं काय ?—देवयानी, तुझ्या मनाचें समा-धान माझ्या ह्या वचनानें कां होत नाहीं ?

देव०:—प्रेमाची धांव प्रफुल्लित होण्याकडे असते.—बरें, तेवढें तरी वचन माझ्या हातावर हात देऊन प्रेमाची शपथ घेऊन द्यावें.

कचः—घे हें वचन. तुझ्या व माझ्या हृदयांत प्रेमस्वरूपानें या वेळीं संचार करीत असलेल्या परमात्म्याची शपथ घेऊन मी तुझ्या हातावर हात ठेवतों,—[ पडद्यांत—शिष्यवर—"हात मागें घे. कचा, हात मागें घे. देवयानीचें असें चोरटें पाणिग्रहण करण्याचा

तुला अधिकार नाहीं. देवयानीचें राजरोस पाणिग्रहण करणारा हा शिशीधर आला पहा! ] मी तुला वचन देतों कीं, तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणच्याही स्त्रीला मी वरणार नाहीं.

[ शिष्यवर प्रवेश करितो. कच हात सोडतो. ]

शिष्य०:—कचा, हा शिशीधर जीवंत असतांना, शुक्राचार्यांच्या ह्या पट्टशिष्यानें दारू सोडिली नसतांना, युवराजांच्या या विद्वान् ब्राह्मणानें आचार्यांचा जामात झाल्यावर सर्व देवांनाही दारू पाजण्याचा विडा उचलला असतांना, देवयानीला फूस लावून जंगलांत एकीकडे तिचें असें चोरटें पाणिग्रहण करतोस काय?—असें करायला शास्त्राधार दाखीव, नाहींतर शिक्षा भोगायला तयार हो.—काय? शास्त्राधार एकही तुझ्या बाजूचा नाहीं! या वादांत कचा, तूं हरला आहेस; तेव्हां मुकाट्यानें ह्या शिशींतला माझा प्रसाद पिऊन तूं माझें शिष्यत्व पतकरलें पाहिजेस.—देवयानी, तूं अशी हांसतेस काय? तूं माझी भावी अर्धांगी आहेस; आणि पत्नीनें पतीला हसूं नये, असा शास्त्राधार आहे. अशी हांसतेस काय? पाहिजे तर तुझ्या पायां पडतो, पण हंसूं नकोस. घरांतल्या बायकाच जर अशा हिणवूं लागल्या, तर प्रतिस्पर्ध्यांशीं आम्हीं वाद तरी कसा करावा?—तूं जर अशी हंसूं लागलीस, तर ह्या माझ्या वैऱ्याशीं लढायच्या ऐवजीं मी रडयला लागेन! साफ सांगतों, रडायला लागेन.

कचः—देवयानी, पाहिलास, हा विद्वान् ब्राह्मण दारूमुळें कसा कुचकामाचा झाला आहे! मद्याचें हें दिवटें ध्यान पाहिल्यानंतर दारू अजिबात सोडण्यांतच स्वतःचें व सांप्रदायाचें कल्याण आहे, असें तुला वाटत नाहीं काय?

शिष्य०:—आम्ही एवढे मोठे विद्वान् असूनही आम्हांला ध्यान म्हणावें!—मला ध्यान म्हणतो काय?—शास्त्राधार दाखीव ध्यान म्हणा



**कचः**--हा विद्वान् ब्राह्मण दारूमुळें कसा कुचकामाचा झाला आहे! [पृ० ६६.

यला ! फुकट नाहीं वाद होत ?—देवयानी, मी ह्या हातानें बारा आणि ह्या हातानें बारा इतक्या सुरया दारू प्यालों आहें; म्हणून सर्व शास्त्राधार आठवत आहेत !—हा घोटभर दारू पिऊं दे, त्यालाही एखाददुसरा शास्त्राधार आठवूं लागेल, मग वाद करण्यास हा पात्र होईल; तोंपर्यंत वाद बंद ! हा गब्रू बारा, चोवीस, छत्तीस बाराचा सबंध पाडा दारू प्याला आहे ! आणि सगळ्या पाड्याइतके शास्त्राधार माझ्या डोळ्यांत लिकलिकूं लागले आहेत !—वाद करण्यापूर्वी कचा, तुझे पाय ओढून तुझ्या छातीवर बसून तुला दारू पाजतों.—देवयानी, हंसूं नकोस, त्याचे पाय ओढण्यापूर्वी प्रथम अर्धांगीच्या पायां पडतों. [ तसें करतो. ]

देव०:—( लाथेनें झिडकारून ) चल दूर हो गाढवा ! कोणालारे अर्धांगी म्हणतोस ? दारूच्या दुर्गंधींत लोळणाऱ्या एखाद्या बाजारबसवीला आपली अर्धांगी म्हण जा !

शिष्य०:—तशी रसिका देवी माझी खरी अर्धांगी आहे. झिंगणाऱ्या दारुड्यांच्या लग्नाच्या बायका पोषाखी अर्धांगी असतात, असा शास्त्राधार मला आठवतो; तेव्हां तुला अर्धांगी म्हटल्यानें तूं कांहीं रसिकेच्या योग्यतेची होत नाहींस, हें तुझें मत चुकीचें नाहीं. पण तुला सांगून ठेवतों हा कच लवकर झिंगणार ! पहिल्या थेंबालाच झिंगेल ! माझ्या तोंडाच्या वासानेंच झिंगायला लागला आहे. प्रतिष्ठा काय ? दाखवतोंच चमत्कार !—माझ्या हातांत सुरया आहेत, नाहींतर माझ्या हातांनींच याचे पाय ओढून दारू अशी पाजली असती !—देवयानी, तूं ओढ त्याचे पाय, मी ओततों दारू त्याचे घशांत! ( पितो ) काय, नाहीं पाय ओढीत ?—नाहीं ? हा पठ्ठ्या पाय ओढणार !

[ कचाचे पाय धरतो. ]

कचः—दारूच्या भांड्याला जसें मीं परवां लाथाडलें, तसेंच आज दारूनें कुजलेल्या बुद्धीच्या ह्या मडक्यालाही लाथाडतों. [ लाथाडतो. ]

शिष्य०:—( दूर सरून न उठतां. ) कचा, आम्ही दारूबाज बायकांच्या लाथा सोसूं, पण पुरुषांच्या लाथा सोसायला शास्त्राधार बिलकूल नाहीं ! देवयानी, ह्या लाथांच्या वादांतही कच हरला आहे.— लाथा मारणें हा शिष्टाचार नव्हे; लाथा मारणें हें शास्त्राधाराला सोडून आहे; लाथा मारणें हा कुमार्ग आहे; लाथा मारणें हें खेडवळपणाचें लक्षण होय; लाथा मारणें, हा प्रतिष्ठितपणा नव्हे; लाथा मारणें हा वितंड वाद आहे; लाथा मारणें हें धर्मयुद्ध नव्हे. [ पाय धरूं लागतो. ]

कचः—शिष्यवरा, झिंगलेल्या दारुड्यांत आणि प्रत्यक्ष पशूंत कांहींच फरक नाहीं.—नासलेली, कुजलेली प्रत्येक गोष्ट मद्यच होय; आणि मद्याला ज्याप्रमाणें लाथाडून दूर केलें पाहिजे, त्याप्रमाणें झिंगून प[शु] झालेल्या विद्वानालाही लाथाडूनच हाकाललें पाहिजे.

[ लाथेनें दूर करतो; युवराज व सेवक येतात. ]

युव०:—कचा ! कोणाला लाथ मारलीस ? कांहीं विचार केलास ?— भोग आतां आपल्या अविचाराचें फळ !—बांधा याच्या मुसक्या !—( अनु- यायी तसें करितात. ) माझ्या विद्वान् मित्राला लाथाडणाऱ्या या उन्म- त्ताला लाथांखालीं तुडवून ठार करा !

देव०:—युवराज, त्या झिंगलेल्या मूर्खानें आम्हां दोघांचा अपमा[न] करून त्यांचे पाय ओढण्यास आरंभ केला; तेव्हां त्यांनीं त्याला जरा दू[र] सारलें; ह्यांत कसला उन्मत्तपणा ?

युव०:—गुरुकन्ये, बायकांनीं माझ्या कारभाराची उठाठेव केले[ली] मला आवडत नाहीं व खपत नाहीं.

देव०:—पण युवराज—

युव०:—माझ्या मित्राला यानें लाथाडलें; आणखी दुसरा कोणचा उन्मत्तपणा असावयाचा ?—माझ्या विद्वान् मित्राला—आम्हांला—कचा, तूं पशु म्हटलें आहेस !

कचः—होय; आणि अजूनही पशुच म्हणतों.

युव०:—अजूनही पशु म्हणतों ! करा, याच्या शरिराचे तुकडे तुकडे करा; आणि आमच्या अरण्यांत वाघ, लांडगा, कोल्हा, कुत्रा, जितके म्हणून मांसाहारी पशु असतील त्या सर्वांना ह्या हलकटाच्या मांसावर ताव मारूं द्या !

देव०:—युवराज, दीन बहिणीला चुडेदान द्या.

कचः—देवयानी, दुष्टांची याचना करून जगण्यापेक्षां मरण अधिक बरें !

देव०:—कचदेवा, प्रियकराचे कल्याणाकरितां प्रत्येकाच्या हृदयांतील दयेच्या देवीला दीनपणाची विनंती करण्यांत बायकांना कमीपणा वाटत नाहीं.—युवराज—

कचः—दुष्टानें केलेली दया विषाहून अधिक घातक असते.

युव०:—करा, याच्या शरिराचे राई राई एवढे तुकडे करा.

कचः—

पद ३६. राग सोहा, ताल त्रिवट.

( " कानन सुनिये " या चालीवर. )

लांछन दया ही होई खलहातें ॥ ध्रु० ॥
नच दया येवो, जीवहि जावो,
अर्पि काजा कच देहातें ॥ १ ॥ [ पडदा. ]

# प्रवेश सहावा.



## स्थळ—मधुवन.

[ देवयानी प्रवेश करिते. ]

देव०:—काय मीं पाहिलें हें ! प्रेमाच्या जोरावर कचदेवाकडून पाणिग्रहणाची शपथ घेववावी, म्हणून त्यांना घेऊन या मधुवनांत आलें; आणि पार्वतीमाई, माझ्या प्रेमाचा शेवट त्यांच्या मरणानें असा केलासना ?

पद ३७. राग पूर्वी, ताल पंजाबी.

( " सावरिया मन भायोरे " या चालीवर. )

कच सखा यमगृहाला गेला आज ॥ ध्रु० ॥
कापिला तृणसम मारिला चेला,
जातचि, तात, लयाला हो सारें काज ॥ १ ॥

संजीवनी विद्या ! संजीवनी विद्या !—आग लागो त्या विद्येला ! मृत्यु दूर पळून न जातां जर त्या विद्येच्या पायीं जवळच येऊं लागला, तर बाबा, तुमच्या विद्येला संजीवनी विद्या तरी कसें म्हणावें ?—माझ्या डोळ्यादेखत कचदेव तसा मारला जावा ?—युवराज, कसले आम्ही गुरु आणि कसले तुम्ही शिष्य !—अहो, मीं प्रेमानें माझा हात पुढें केला होता, अहो, त्यांनीं प्रेमानें माझ्या हातावर हात ठेवला होता, प्रेमाचा विध्वंस करणारांची घरेंदारें आपोआप जळून खाक झाल्याशिवाय कशीं राहतील ?—कोण, काय बोलतें आहे !—काय—काय—जेथें प्रेमाच्या सन्मान होत नाहीं, तेथें संजीवनी विद्या नांदत नाहीं—कोण मला बोलावतें आहे ?—कचदेवा, तुमची प्रेमाची



देवः--कोण मला बोलावतें आहे ! [ पृ. ७०

हांक मला ऐकूं आली--आलें हो आलें, ही मी आलेंच, तुमच्या मागोमाग आलें !—पण क्षणभर थांबायचें होतें; प्रेमाची ताटातूट करणारांना प्रथम मला शाप देऊं द्या.—युवराज, वृषपर्व्यांच्या घराण्याची प्रतिष्ठा संपली ! प्रेमी जीवांचा सन्मान न करणाऱ्या तुम्हां अधमांच्या नगरींतून माझ्या बाबांची संजीवनी विद्या बाहेर जाईल, आणि सिंहासनासकट वृषपर्व्यांची राजधानी बेचिराख होईल, असा कचदेवाच्या या प्रेमी देवयानीचा वृषपर्व्यांचे घराण्याला शाप आहे.

पद ३८. राग सोहनी ताल टक्का.

[ " फुलवा बिनत डारडर " या चालीवर. ]

कविसि अतुल चाप शाप, मीच खरी कविकुमारि;
कविवर करिल मम वाणी ही खरी ॥ ध्रु० ॥
राजा, नच कचासि, वधिलें भार्गव-तपासि;
जाळो तुज देवयानिवाणी विषारी ॥ १ ॥



## प्रवेश सातवा.

[ शुक्राचार्य सचिंत बसले आहेत; युवराजानें पायावर डोकें ठेविलें आहे; वृषपर्वा, सेनापति, शर्मिष्ठा वगैरे हात जोडून उभीं आहेत; असा देखावा. ]

शर्मि०:—

पद ३९. राग जंगला, ताल धुमाळी.

[ " विनवि सुता " या चालीवर. ]

गुरुममता माता गमली,
बालकासि घे अजि जवळी ॥ ध्रु० ॥

भिजवी तो उद्यान जलानें,
जाळि कधीं न तया माळी ॥ १ ॥

वृष०:—युवराजाला अभयवचन देऊन गुरुदेवतेनें शिष्यवृंदाला कृतार्थ केलें पाहिजे.

शुक्रा०:—ऊठ; बाळा, ऊठ. तुला अभय आहे. (युवराज उठतो. मला प्रथम असें सांग, कचाला मारण्याची आज्ञा तूं कां दिलीस? देवयानीला दुःख देऊन माझा जीव अशा रीतीनें कासावीस करण्याचें काय कारण झालें?

युव०:—गुरुदेवतेचें अभयवचन मिळाल्यामुळें अन्तःकरण मोकळें करून बोलण्याचा धीटपणा या दीन शिष्याचे अंगांत आला आहे. गुरुमहाराजांना विदितच आहे, कचाला मी शत्रु समजतों; आणि शत्रूशीं योग्य कालीं, योग्य स्थलीं, योग्य कुरापत काढून लढणें हें कांहीं पाप नाहीं.

शुक्रा०:—तुम्हां सर्वांचा शत्रु कच आहे, हें खरें; पण शत्रूला मित्र करून तुमच्यांत मिसळून सोडण्याचा माझा उद्योग चालू असतांना व या पचनक्रियेला एक वर्षाचे अवधीची सीमा मीं आंखून दिली असतांना, माझ्या योजनेचें उल्लंघन, युवराज, तूं कां केलेंस?

युव०:—या कामीं मी गुरुदेवतेचा अपराधी तर खराच; पण या पायांपाशीं माझी एवढीच विनंति आहे, माझा अपराध गुरुमाऊलीनें पोटांत घालण्यासारखा आहे. मद्याबद्दल व आम्हां सर्वांबद्दल कचास वाटत असलेला तिटकारा आणि देवयानीचें कचावरील प्रेम, या दोन गोष्टींचा विचार मी एकसारखा करीत होतों; आणि आमचे मंडळांत

कचाला पचविण्याचें ऐवजीं आम्हीच देवांचें भक्ष होऊन बसूं, अशी भीति माझ्या मनाला डवचत होती.—मी या पायांचें लेकरूं आहें, मला दूरदृष्टि नाहीं; पण एवढी गोष्ट खरी, मीं जें केलें तें या भीतीनें त्रस्त होऊन केलें.

वृष०:—आम्ही सर्वही याच भीतीनें गांगरून गेलेले आहों.

युव०:—अंगाला अंग घासून कचाच्या भीतीचें हें भूत माझ्या सभोंवतीं घिरट्या घालीत होतें; इतक्यांत आपला प्रियशिष्य, वेदो-नारायणाचा मुलगा, मूर्तिमंत वेदविद्या, माझा विद्वान् मित्र शिष्यवर, मद्याच्या प्रफुल्लतेंत हृदय निष्कपट व मोकळें करून अव्याज चेष्टेंत चूर असतांना कचानें त्याचें उत्तमांग लाथाडलें ! हा अपमान सहन करण्याचें भान, गुरुमाउलीनें माझ्या मनगटांत ठेवलेल्या शक्तीला राहिलें नाहीं; आणि भीतीचें भूताला अपमानाचे क्रोधाग्नींत कचाबरोबरच बळी देऊन, तें भूत पुन्हा जिवंत होऊं नये म्हणून मी हे पाय घट्ट धरून बसलों.—गुरुमहाराजांनीं मला अभय दिलेंच आहे; तेव्हां संजीवनी विद्येमुळें कच पुन्हा जिवंत होणार नाहीं, असा मला आशीर्वाद देऊन—

वृष०:—आम्हां सर्वांना भीतींतून कायमचें मुक्त गुरुमहाराजांनीं केलें पाहिजे.

शुक्र०:—तसा आशीर्वाद द्यायला माझी हरकत नाहीं. मारला जाऊं नये, पण मारला गेला; आतां जिवंत करून तरी मला काय करा-यचें आहे ?—पण देवयानी काय म्हणेल ?

पद ४०. राग देशी, ताल झपताल.

[ डिडौंडन बाजे " या चालीवर. ]

अहंकार माझा विदेही कराया
धजते तीं देवा वरुनिया ॥ ध्रु० ॥

मम जीवज्योति सुता मृत्युहातिं
जरि जाई, यश नाहिं या सांप्रदाया ॥ १ ॥

कचाला जिवंत करा, असा हट्ट देवयानीनें जर धरला—

वृष०:—तेवढीच काय ती भीति आम्हांला राहिली आहे.

युव०:—गुरुमाऊलीनें देवयानीचे लाड पुरवूं नयेत, असें मी कोणच्या तोंडानें म्हणूं ? ती जशी आपली मुलगी तशी माझी बहीण आहे; तरी पण कच जिवंत होऊन त्यानें देवयानीचें पाणिग्रहण केलेलें पाहण्यापेक्षां, ताईच्या प्रेमाला स्वतःचा बळी गुरुमाउलीच्या चरणतीर्थी देणें मला अधिक श्रेयस्कर वाटतें; तेव्हां माझ्या हातांतील या तरवारीला माझें शिर गुरुमाउलीच्या चरणीं अर्पण करूं द्या !

[ पायावर शिर ठेवून स्वतःचे मानेवर तलवार उगारतो. ]

शुक्रा०:—( तलवार धरून ) मारलेला कच जसा मला जिवंत करतां येतो, तसाच आत्महत्या करणारा युवराजही माझ्या मंत्रानें जिवंत होईल.

युव०:—आपण जिवंत केलेल्या युवराजाचें शिर गुरुचरणीं माझी तलवार पुन्हा अर्पण करील !

शुक्रा०:—ऊठ; युवराज, ऊठ. कचाला मी जिवंत करूं नये, एवढेंच तुला वचन पाहिजे ना ?

युव०:— होय, एवढेंच वचन पाहिजे. माझ्या मस्तकावर अभयहस्त ठेवून गुरुमाउलीनें मला तसें वचन द्यावें.

शुक्रा०:—तुझ्या मस्तकावर हा अभयहस्त ठेविला. (तसें करितो. ) आतां तुला वचन देतों—( पडद्यांत देवयानी—" बाबा, वचन इतक्यांत देऊं नका; वचन इतक्यांत देऊं नका ! " )

शुक्रा०:—कां, कां वचन देऊं नको ? [ देवयानी येते. ]

देव०:—बाबा, तसें वचन इतक्यांत देऊं नका; तसें वचन इतक्यांत देऊं नका !–( पाय धरून ) कचदेवाला जिवंत करा म्हणून हट्ट धरून बसण्याकरितां मीं हे पाय धरले नाहींत; युवराज मागतात तसलें वचन त्यांना देऊं नका, असेंही माझें म्हणणें नाहीं; कचदेवांमागून जाऊं लागलेले माझे प्राण संजीवनी विद्येनें आपण या शरीरांत पुन्हा कोंडणार नाहीं, असें वचन प्रथम मला द्या आणि नंतर युवराजांचे हेतु सफल करा.

शुक्रा०:—देवयानी, तुझे प्राण तुझें शरीर सोडून जात असतांना, जर पुन्हा त्यांना याच शरीरांत कोंडून ठेवतां आलें नाहीं, तर मीं संजीवनी विद्या कशाला संपादन केली ?

देव०:—बाबा, कचदेवांचे प्राणांना भेटण्याकरितां माझे प्राण हें शरीर सोडीत आहेत; संजीवनी विद्येच्या जोरावर प्रेमाच्या ह्या भेटीचा आपण विध्वंस करूं नका, एवढी हौस या लाडक्या मुलीची पुरवाच !–कचदेवांसाठीं जसा आपण संजीवनी मंत्र जपणार नाहीं, तसा देवयानीसाठींही तो मंत्र जपूं नका.—मला प्रथम हें वचन द्या, आणि नंतर मग युवराजांना तें वचन द्या !

शुक्रा०:—तुम्हीं दोघेही हट्टी आहां ? तेव्हां तुम्हां दोघांचेंही मी ऐकत नाहीं.—अधिराज, आम्हीं वृद्धांनीं तरुणांच्या हेक्याप्रमाणें कां वागावें ?–जा, तुम्हां दोघांनाही मी कोणचेंच वचन देत नाहीं.—अधिराज, हा माझा मुलगा, ही माझी मुलगी.–युवराज, तुला दुःखीकष्टी ठेवून मी सुखी राहणें शक्य नाहीं; देवयानी, तुझ्या प्राणांबरोबर माझेही प्राण शरीर सोडून बंधमुक्त होतील !–अधिराज, मी काय करूं ?

दोघेंही हट्टी, आणि यांचा हट्ट एकमेकांशीं अगदीं विरुद्ध ! याला बोल लावतां येत नाहीं; हिला दूर सारतां येत नाहीं. माझा धर्म कोणचा हेंच मला या वेळीं समजत नाहीं !—युवराज, तुम्हांला संतुष्ट करणें मला जरी साधत नाहीं, तरी तुम्हांला मी भीतिमुक्त करितों. माझा जामात कच होणार हें तुमच्या भीतीचें कारण नसून, माझा जामात या नात्यानें तुमचा शत्रु संजीवनी विद्येचें हरण करील, हीच ना तुमची भीति ? मी प्रतिज्ञा करून सांगतों, तुमच्या शत्रूला जर कधीं काळीं संजीवनी विद्या मिळाली, तर माझ्या प्राणांबरोबरच त्यानें ती हरण केली, असें पक्कें समजा. देवयानी पाहिजे त्याचा हात धरून माझ्या घरांतून निघून जावो, माझ्या घराण्याचा अंकुर शत्रूच्या हातांत सांपडल्यामुळें संततीहीनांच्या नरकांत देवयानी मला ढकलो, माझ्या सांप्रदायाच्या शक्तीचें मूळ संजीवनी विद्या मी माझ्या हृदयांत कृपणाप्रमाणें कोंडून ठेवणार; आणि देह ठेवण्यापूर्वी माझ्या सांप्रदायाचा पुरस्कर्ता होण्यास लायक असलेल्या शिष्याचेच हवालीं मी करणार !—अधिराज, संजीवनी विद्या माझ्या शरीराकरितां नसून, माझ्या सर्व सांप्रदायाकरितां आहे; आणि ती केवळ माझ्या सांप्रदायाकरितांच रहावी, म्हणून देवयानीच्याच काय, पण माझ्याही शरीराचें पतन झालेलें मला श्रेयस्कर वाटेल !—अधिराज, युवराज, माझ्या शब्दावर व सांप्रदायावरच्या माझ्या अभिमानावर विश्वास ठेवा आणि कच विद्याहरण करील ही भीति सोडून द्या!—सांप्रदायाचे कर्तव्याला न विसरतां,मला आतां देवयानीचें कांहीं प्रिय करतां आलें तर करूं द्या.—अधिराज, मी आतां ध्यानस्थ बसून संजीवनी विद्या कचाला जिवंत करण्याकरितां जागृत करितों; तोंपर्यंत आपण आदिशक्तीचें स्तवन करा.

[ वृषपर्वा, युवराज, वगैरे स्तब्ध उभे राहतात. ]

देव०:—

पद ४१. राग पहाडी, ताल दीपचंदी.

[ " राज दैंदो " या चालीवर. ]

देव-दैत्यां जीवनभूता जी आद्या,
कविवररता ती विद्या ॥ ध्रु० ॥
अमरकाव्या प्रीति विनवी,
प्रेमी व्हावया जीव धरो कच-काया ॥ १ ॥

शुक्रा०:—कचाला जिवंत करण्याचा संकल्प करून मीं आतां संजीवनी विद्या जागृत केली आहे. तिच्या प्रसादानें सचेतन झालेल्या कचाच्या शरिराचे परमाणूंनो, आपलें नवीन स्थान एकदम सोडून माझ्या आज्ञेनें एकशरीरी होऊन कचास मजपुढें जिवंत उभा करा !

[ कच प्रवेश करितो. ]

कच:—गुरुदेवतेच्या कृपेनें पुन्हा सजीव झालेला हा कच गुरुचरणांला अभिवादन करतो.

शुक्रा०:—देवयानी, हा तुझा प्रियकर तुजपुढें उभा आहे. याचेवर तुझें निष्कपट प्रेम आहेना ? इतर कोणच्याही सुखापेक्षां याच्या सहवासाचें सुख तुला अधिक प्रिय वाटतें ना ? आप्तइष्ट, आईबाप, धनदौलत, ह्या सर्व सुखसाधनांचा वियोग सोसवेल, पण कचाची व तुझी ताटातूट झाली असतांना जिवंत राहण्यानेंच असह्य वेदना तुला होतील, अशा प्रकारचें सतीचें प्रेम कचाविषयीं तुझ्या हृदयांत उत्पन्न झालें आहे ना ?

देव०:—बाबा, माझ्या प्रेमाचें शब्दचित्र आपणांसारख्या स्वयंभू कवीलाही काढितां येणें शक्य नाहीं !

शुक्रा०:—कचा, देवयानीवर तुझें निस्सीम प्रेम आहे ना ? दुसऱ्या एखाद्या लोभाच्या नादानें प्रेमाचा भास तर होत नाहीं ना ? इतर सर्व लोभाहून देवयानीच्या प्रेमाची किंमत तूं अधिक समजतोस ना ?

कचः—

पद ४२. राग सोरट, ताल झपताल.

[ "सखिवीन नाहिं मोरि जिया" या चालीवर. ]

जगीं सुख नाहीं दुजें मज, कच काज
जरि धरि निर्धारीं तरि देत यशभाग तिज ॥ ध्रु० ॥
शशि मी, प्रभा ही; धवल करूं हें,
तमडोहिं बुडतांहि, जग तपें निज ॥ १ ॥

शुक्रा०:—कचा, दैवयानीवरील अपत्यस्नेहामुळें मी तुला जिवंत केलें आहे; आणि तुम्हां दोघांची एकमेकांवर पूर्ण प्रीति आहे असें पाहून, माझ्या सांप्रदायाच्या शत्रूला मी माझा जामात करणार नाहीं, ही माझी प्रतिज्ञा मी मागें घेत आहे. सांप्रदायावरील निष्ठा आणि अपत्यस्नेह या दोन गोष्टींचा विरोध येऊन तुमच्या प्रेमाचा हिरमोड होऊं नये म्हणून, संजीवनी विद्या सांप्रदायाकरितां मी राखून ठेवतों; आणि कचा, ज्या प्रेमापासून सर्व कला, सर्व विद्या, व सर्व सुखसाधनें उगम पावतात, त्या प्रेमाचा मूर्तिमंत अवतार, देवयानीचा हा हात, मी आनंदानें तुला अर्पण करितों. कचा, तूं इकडे यावयास निघालास त्या वेळीं, नानाप्रकारांनीं देवयानीला रिझवून तिचें मन वश करून घे, असें देवेंद्रानें व बृहस्पतीनें तुला बजावून सांगितलें; अर्थात् या मंगलकार्याला त्यांची पूर्ण संमति आहेच. कचदेवा, मी आनंदानें तुला अर्पण केलेल्या माझ्या मुलीचा हात तूंही आनंदानें ग्रहण कर.



कचः—संजीवनी विद्येशिवाय मला देवयानीचें पाणिग्रहण करतां येत नाहीं. [ पृ० ७९.

कचः—संजीवनी विद्येशिवाय मला देवयानीचें पाणिग्रहण करतां येत नाहीं.—संजीवनी विद्येच्या लोभानें मी देवयानीवर प्रेम केलें नाहीं व करीत नाहीं; परमेश्वरसाक्ष देवयानीवर माझें प्रेम निर्लोभ आहे. पण आचार्य, पितरांचें ऋण व देवांचें ऋण फेडल्याशिवाय प्रेमस्वरूपाच्याही लोभाचा स्वीकार मी करणार नाहीं, अशी प्रतिज्ञा देवेंद्राचे समक्ष मीं केली आहे!—संजीवनी विद्या मला माझ्या सुखासाठीं नको आहे, वाड-वडिलांचें व सांप्रदायाचें देणें देण्यासाठीं पाहिजे आहे. गुरुमहाराज, प्रेमाच्या सुखाचा अनुभव घेतांना देवेंद्राच्या सभेंतील वियोगदुःखाच्या यातना सोसणाऱ्या प्रेमी जीवांची आठवण मला होते. माझें एकट्याचेंच सुख किंवा माझें एकट्याचेंच दुःख, एवढाच जर हा प्रश्न असता, तर देवयानीकरितां पाहिजे तें दुःख सोसण्यास मी तयार झालों असतों; पण एका प्रेमी जोडप्याचे सुखाकरितां सदाचारी व प्रेमी असंख्य जीवांच्या दुःखाकडे मी कशी डोळेझांक करूं ? देवेंद्राच्या सभेंतील दुःखीकष्टी व म्लानवदन झालेल्या स्वकीयांच्या दुःखाचें निवारण करण्याकरितां, माझ्या जिवाच्या अमृतवल्लीशीं, या असल्या दिव्य तेजाशीं, मूर्तिमंत प्रेमाच्या पुतळीशीं संलग्न होण्याच्या सुखाचा त्याग करणें, हेंच बृहस्पतीचे मुलाला या वेळीं उचित होय !

[ पडदा पडतो. ]



# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.



स्थळ—मधुवन.

[ सेनापति प्रवेश करतो. ]

सेना॰:—कचाला कसें मारूं किंवा कसें जाळूं, ह्याचा विधिनिषेध माझ्या मनाला वाटत नाहीं; पण देवयानीबरोबर बोलत असतांना देवयानीला दूर लोटून कचाच्या मुसक्या कशा बांधूं, ही मला काळजी लागली आहे ! युवराज ह्या कामीं माझे गुरु आहेत, पण प्रेमी जोडण्याचा प्रेमाच्या वेळीं नाश करतांना मन जरा कचरतें.—ह्या सोसाट्याचा वाऱ्यानें मन कचरूं देऊं नकोस, असें आतांच मला बजावलें असून, निर्दयपणानें शत्रूचा नाश कसा करावा, ह्याचा गुरुमंत्रही त्यानें स्वतःच्या कृतीनें ह्या वेळीं माझ्या कानांत फुंकला आहे.—देवयानीला एकांतांत प्रेमालिंगन देतांना जरी कच आतां माझ्या दृष्टीस पडला, तरी एका हातानें प्रियकराच्या मिठींतून गुरुकन्येला सोडवूं, दुसऱ्या हातानें कचाला त्याच्या चितेकडे न्यावयाला मी कधींही चुकणार नाहीं.

पद ४२. राग धानी, ताल त्रिवट.

[ " मानत नाहिं लंगरवाधीट सखि " या चालीवर. ]

सांगत जात पवन कानांत मज ।
करि कचवध सहज वनांत असा ॥ ध्रु॰ ॥

वेगें वेलि विटप विदय विलयासि नेत ।
फल कुसुम उडावि गगनांत कसा ॥ १ ॥

[ युवराज येतो. ]

युव०:—सेनापति, या वेळीं कच देवयानीबरोबर पलीकडल्या कुंजांत प्रेमाच्या गोष्टी कुजबुजत बसला आहे; त्याला जिवंत धरून मजपुढें घेऊन या.

सेना०:—आज्ञा महाराज,

[ सैनिक व सेनापति मुजरा करून जातात. ]

युव०:—( स्वगत ) ही संजीवनी विद्या माझ्या ताब्यांत आली पाहिजे, आणि मदिरेच्या निशेंत गुंगत पडण्याशिवाय दुसरें तिसरें कांहीं एक काम आचार्यांकडे राहतां कामा नये, तरच माझें वैभव शाश्वत होईल.—आचार्यांनीं मला संजीवनी विद्येचा उपदेश कां करूं नये ?—जामाताचे हातांत संजीवनीची सत्ता देण्याचा आपमतलबीपणा आचार्यांसारख्या महात्म्याचा जर सुटत नाहीं, अपत्यस्नेहाचे पांघरुणाखालीं असला लोभ जर त्यांना मिठी मारून बसूं शकतो,—तर शिष्यवरासारखा एखादा दारुडा नवरा देवयानीला गांठून देऊन आचार्यांचे घराण्यांतील गुरुपदवी स्वत:चे पायापाशीं लोळविण्याची खटपट युवराजानें कां करूं नये ? बरें झालें; देवयानीचा हात कचानें झिडकारल्यानंतरही देवयानीच्या हट्टाकरितां आचार्यांनीं वर्षभर कचाला ठेवून घेऊन, त्याची वृत्ति पालटविण्याची कामगिरी देवयानीला पुन्हा सांगितली ! बाबांची संमति माझ्या नव्या व्यूहाला आतां तेव्हांच पडेल.

[ शर्मिष्ठा येते. ]

शर्मि०:—दादा, तुझा विजय असो!—बाबांनीं तुझ्या बेताला रुकार दिला असून अपत्यस्नेहाला जाणण्याला विसरणार नाहीं, असें त्रिवार वचन दिलें आहे.

या कामीं बाबांची आज्ञा एवढीच आहे, गुरुदेवतेची प्रसन्नता तेंच आमचें खरें वैभव, हें तूं विसरूं नकोस.

**पद ४३.** राग भैरवी, ताल त्रिवट.

[ " सुन प्यारि मोहना " या चालीवर. )

करि आज्ञा तो पिता, गुरुला रिझवी,
अजि मानि रे तयाला निज राजदेवता ॥ ध्रु० ॥
देत मजला, दैत्यतरुला, अमरजला, वंदिता;
फलभारा, तोचि होई, रस सारा सेवितां ॥ १ ॥

युव०:—त्यांची नको काळजी करायाला ! शुक्रगुरूंला कसें खूष करायचें तें मला चांगलें माहीत आहे.—ताई, माझ्या बेताला यश येणार ! कारण तूं बाबांचा रुकार आणायला आणि सेनापतींनीं कचाला पकडून आणायला एकच गांठ पडली ! पहा ताई, तूं बाबांना जाऊन सांग, आपल्या वैभवाची काळजी दूर करणारा आपला पुत्र लवकरच आपले दर्शनाला येत आहे.

[ शर्मिष्ठा जाते, सेनापति व सैनिक कचाला घेऊन येतात. ]

सेना०:—आपल्या शत्रूला मुसक्या बांधून धरून आणला आहे. शिक्षा बोलून दाखविण्याचा अवकाश कीं लागलीच अंमलांत आणली म्हणून समजावें.

युव०:—कचा, तुला जिवंत जाळून तुझ्या हाडांची राख करण्याचा हुकूम, अधिराज वृषपर्वामहाराज यांनीं केला आहे. संजीवनी जपतांना तुला जिवंत करण्याचा संकल्पच आचार्यांना करतां येऊं नये, म्हणून तुझ्या राखेचा तिसरा भाग मदिरेबरोबर आचार्यांना पाजण्यांत येईल; देवेंद्राच्या आशेची राखरांगोळी झाली, हें कळविण्याकरितां एक भाग तुझ्या बापाकडे

पाठविण्यांत येईल; आणि बाकीचा भाग या युवराजाची चाणाक्षता शत्रूंना असें धुळीला मिळविते याची आठवण म्हणून आमच्या खजिन्यांत ठेवण्यांत येईल.—कचा, संजीवनी विद्येला तूं मुकलाच आहेस, पण आतां खरोखरी प्राणांना मुकण्याची वेळ आली आहे ! तुझी राख आचार्यांनाच पाजण्याच्या माझ्या युक्तीमुळें आचार्यांना तुला जीवंत करतां येणेंच शक्य नाहीं.—कचा,एका अटीवर तुला प्राणदान देतों; संजीवनी विद्येचा नाद सोडून येथून निघून जाण्यास जर कबूल असलास, तर तुला प्राणदान मिळेल. देवयानीशीं लग्न तूं पाहिजे तर कर किंवा नको करूं, आम्हांला त्याची पंचाईत नको; पण संजीवनी विद्येचा नाद सोडून तूं येथून निघून गेलें पाहिजे.

कचः—युवराज, तुमच्या धमकावणीनें मी संजीवनी विद्येचा किंवा देवयानीचा–कोणाचाच नाद सोडीत नाहीं. प्रसंग पडल्यास हजार जन्म घेऊन हजार वेळां श्री शंकराचे चरणीं शिरकमल अर्पण करून, स्वकीयांच्या उद्धाराकरितां संजीवनी विद्या मिळविण्याचा ज्याचा दृढ निश्चय, त्याला मृत्यूची भीति घालून काय उपयोग ?–देह जाळतां येतो, पण देह धारण करून त्या देहाकडून स्वकीयांची सेवा निरपेक्ष बुद्धीनें करण्याच्या इच्छेचा मूलाधार–शरीरांतला आत्मा–युवराज, कोणालाच जाळतां येत नाहीं. देवयानीला प्रसन्न करून संजीवनी विद्या संपादन करून घे, अशी मला पित्याची व देवेंद्राची आज्ञा आहे; आणि देवयानीच्या प्रेमाचे पायावर संजीवनीच्या प्राप्तीची इमारत उभारली गेली असून, आतांच्या या दुसऱ्या मृत्यूनें त्याच्यावर कळस चढणार, अशी माझी खात्री आहे ! अशा आनंदानें काम सहज पार पडत असतांना संजीवनीचा नाद सोडून येथून कोण निघून जाणार ? युवराज, माझ्या चितेकडे मला नेण्याची आज्ञा करावी.

युव०:—जा, याला चितेकडे घेऊन चला; आणि देवयानीच्या प्रेमावर यानें उभारलेल्या सर्व इमारती पायासकट जाळून खाक करा. कचा, तुझ्या हाडाची पूड देवगुरूकडे पाठविण्यांत येईल, त्या वेळीं कांहीं निरोप पाठवायाचा असल्यास सांगून ठेव.

कचः—

पद ४४. राग बिलावर, ताल झपताल.

इतुकें कळविं अजि माझ्या गुरुला,
मरतांहि भय नाहीं शिवलें कचाला ॥ ध्रु० ॥
यमभीतिलव येति नच या शरीरीं,
साक्षी चिता होई आतां तयाला ॥ १ ॥

[ सैनिक कचाला नेतात. ]

युव०:—जा ; तुझी ही दर्पोक्ति शेवटचीच आहे. ( स्वगत ) लक्ष्मी-पेक्षांही विद्या अधिक चंचल असते, हें बाबांच्या ध्यानांत अद्याप आलेलें नाहीं ! एका घराण्याला, एका सांप्रदायाला, एका देशाला, विद्या तरी कोठें चिकटून राहिली आहे ? लक्ष्मी कित्येक पिढ्या एकाच घराण्याला चिकटून राहिलेली आम्हीं पाहिली आहे; पण विद्वानाचा मुलगा बुद्धिहीन, अशीं उदाहरणें पावलोपावलीं दृष्टीस पडतात ! सरस्वतीच्या चंचलपणाचाच कित्ता लक्ष्मी गिरवते. प्रथम विद्या जाते, मागाहून संपत्ति नष्ट होते. संजीवनी विद्या तर चंचलांतली चंचल ! पापाला पायाखालीं तुडवून जमीनदोस्त करून पुण्याचे वृक्षाला महात्म्यांनीं पाणी पाजावें, तों विश्वांत गुप्तपणें सैरावैरा संचार करणारी संजीवनी विद्या, पापाच्या जुन्यापुराण्या मुळांना जारिणीप्रमाणें चोरून यथेच्छ अधरामृत पिऊं देते; आणि जुनें पा

कोमल नवपल्लव धारण करून नवीन मोहानें दुनियेस झुकवितें ! बरें, पापच आपण फुलवीत बसावें, तर संजीवनी विद्या पुण्याचा वृक्ष एका क्षणांत जमिनींतून बाहेर काढून गगनाला नेऊन भिडविते !—या अल्लड विद्येच्या नाकांत वेसण घालण्याचें काम त्या वृद्ध आचार्यांचे हातून पार पडणें शक्य नाहीं. संजीवनीचा पक्का कोंडमारा करून तिला कायमची दासी ह्याच पठ्या करणार ! [ जातो. ]



## प्रवेश दुसरा.



स्थळ—शिष्यवराचें मंदिर.

[ शिष्यवर रसिकेचा हात धरून प्रवेश करितो. ]

शिष्य०:—रसिके, देववानीला तुझ्या इतकीही बुद्धि नसल्यामुळें माझ्या पाणिग्रहणाची किंमत तिला समजत नाहीं, याबद्दल मला तिची मनापासून कींव येते !—असल्या ह्या हाताचा आश्रय कोणची स्त्री करणार नाहीं ? दारूची लज्जत देवयानीची जीभ जर विसरली नसती, तर या हाताच्या स्पर्शाची चैन—जाऊं द्या, तिच्या कपाळींच नाहीं, त्याला तूं तरी काय करणार ? बाकी तूं मात्र खरी भाग्याची !

पद ४५. राग वहार, ताल त्रिवट.

[ " करसुले जायें गडवा " या चालीवर. ]

गुणवती कांता मजला; तूं होशि
पति कर हा तुजला ॥ ध्रु० ॥

विवाहासि विधियुत या करूनियां
तोतया, दावूं मार्ग कुलवधूला ॥ १ ॥

रसिके, मी देवयानीशीं लग्न करणार नाहीं; तुझ्याशीं करणार. देवयानीच्या नाकावर टिचून तुझ्याशीं लग्न लावणार ! म्हणजे मग देवयानी शुद्धीवर येईल आणि कचाचा नाद सोडून देईल !

रसि०:—

पद ४६. राग देस ताल केरवा.

[ "श्यामरे मोरि बैंया ग्रहोना" या चालीवर. ]

वाहिली मम तनु नृपाला,
अशा विवाहें सुख नसे तयाला ॥ ध्रु० ॥
योग्य न बंधन स्वैराचरणा;
त्याज्य वधुपद दासिजनांना ॥ १ ॥

आपणच मला त्या फुकस्याशीं लग्न करायला सांगितलेंत, नाहीं का ? असला एखादा फुकस्या नवरा नांवाला असला म्हणजे युवराजांच्या सुखावर प्रतिष्ठितपणाचें पांघरूण सहज पडतें, असें आपणच काल म्हणालां ना ? उद्यां जर मीं आपणांशीं लग्न लावलें, तर युवराजांच्या प्रतिष्ठितपणाला—

शिष्य०:—कमीपणा न येतां उलट त्यांत भर पडेल; कारण विद्वत्तेच्या अस्तरासकट माझें पांघरूण त्यांच्या व तुझ्या चैनीवर पडेल !

रसि०:—पण तें आपणाला कसें पाहवेल ?

शिष्य०:—फुकट, रसिके, फुटक इतकीं वर्षें आम्हां दारूबाजांच्या संगतींत घालविलींस ? अग, आम्ही दारूबाज कोणचाच विधिनियम पाळीत नाहीं; मग लग्नाच्या संस्काराची आडकाठी आम्ही कसचे जुमान-

णार ? मन आणि बुद्धि यांनीं चिरसहवासाच्या सवईनें पत्करलेल्या, समाजानें लादलेल्या, किंवा दुबळ्या देहानें पड खाल्ल्यामुळें अशक्तांना सुखावह वाटणाऱ्या आचारांना, विचारांना, व विकारांना झुगारून देण्याकरितां तर दारूची शक्ति आम्ही उसनी घेतों ! अग, दारू आमचा सावकार, आम्ही कुळें, आणि शक्ति हें कर्ज; ज्या कामासाठीं कर्ज काढलें असेल त्या कामाकडे तें खर्च केलें नाहीं, तर सावकार जसा जळफळतो, त्याप्रमाणें दारूनें दिलेली शक्ति परिस्थितीचे संस्कार आणि बंधनें तोडण्याकडे जर खर्च केली नाहीं, तर मदिरादेवी तेव्हांच रुष्ट होते ! मी तर असें म्हणतों कीं, रंग महालांत प्यालेली दारू जर लग्नबंधनें दृढ करूं लागली, तर क्षणक्षणाला नव्या नव्या सुखाचें दर्शन देणारी देवता असें तरी या मदिरेला कां म्हणावें ? रसिके, तूं अगदीं काळजी करूं नको; माझ्याशीं तूं लग्न करच ! थोड्याच दिवसांत या लग्नामुळें युवराज तुझ्यावर अधिक प्रसन्न झालेले तूं पाहशील. कारण दारूच्या चोरीच्या शक्तीचा उपयोग चोरट्या सुखाकडे झाल्यानें युवराजांना कृतार्थ झाल्यासारखें वाटेल ! लांचाच्या द्रव्याप्रमाणें चोरट्या सुखांत विशेष खुमारी असते; आणि चोरटी शक्ति देऊन चोरटीं सुखें भोगायला देणारी देवता मदिरा असल्यामुळें, फुकट्या चोरांचें हें जग त्याच देवतेची पूजाअर्चा करितें. आम्हां दारूबाजांचा असा स्वभाव बनतो, उत्तमांतलें उत्तमही सुख बिनचोरीचें असलें, कीं आम्हांला शेळपट लागतें ! मिठाशिवाय जसें उत्तम अन्न अळणी, तसें चोरीच्या भावनेशिवाय उत्तम सुखही आम्हांला मिळमिळीत ! कारण चोरीची राणी ती दारू, आमचा पिंडही चोरीचाच बनविते. रसिके, फार काय सांगूं, सर्व तरुणींत सुंदर म्हणून नांवाजलेली देवयानी जर आपण होऊन माझ्याशीं लग्न करूं लागली, तर मी तिला साफ सांगेन, तूं दुसऱ्या कोणाची तरी बायको हो, आणि माझ्यावर चोरून प्रेम कर, म्हणजे हा दारुडा खरा सुखी होईल ! माझें जसें

तसेंच युवराजांचें. म्हणून म्हणतों, माझ्याशीं तूं लग्न केल्यानें युवराजांना अधिक बरें वाटेल!

रसि०:—पण तुम्हीं निर्लज्जपणानें नातेंगोतें असें उघड बोलून दाखविल्यावर युवराजांना चोरटें सुख कोठचें शिल्लक राहणार?

शिष्य०:—हो, हेंही खरें. ही शंका युवराजांनाच विचारली पाहिजे.—हे पहा ते आलेच! (युवराज व मधुकर येतात.) रसिके, युवराज आज फारच दुःखीकष्टी दिसतात; तेव्हां प्रथम त्यांना दारूच पेला भरून दे. मग मी माझी शंका विचारतों.

[रसिका पेले भरून देते.]

मधु०:—अगदीं बरोबर!—अहो मलाही दुःख झालें आहे हो. अगदीं असेंच.—माझें देखील रडें अगदीं कोसळायच्या बेतांत आहे; तेव्हां माझ्याही नरडींत पेल्यावर पेले ढोसून ओता! मोठ्या नदीला पूर आला म्हणजे तिला मिळणाऱ्या धाकट्या ओढ्यांना तुंबा बसून त्यांचे पाणी उलटें वाहूं लागतें, त्याप्रमाणें दारूच्या झोतामुळें माझे दुःखाश्रूचे ओघ आतलें आंत उलटे ढकलले गेले पाहिजेत.

युव०:—रसिके, मदिरा प्राशन करून माझी काळजी दूर व्हावयाला पाहिजे खरी, पण—

शिष्य०:—दारूच्या कर्तबगारीसंबंधानें व चमत्कारासंबंधानें आपली कांहीं शंका असली, तर ती प्रथम मला विचारा. समजूत घालीन किंवा मदिरेचा प्रत्यक्ष चमत्कार दाखवीन, पण शंका शिल्लक ठेवणार नाहीं. आपल्या शंकेचें निरसन केल्यावर मी माझी शंका विचारणार आहें.

युव०:—माझी काळजी—

शिष्य०:—काळजी नको, शंका विचारा; समाधान करतों. विद्वानाचा सहवास घडला म्हणजे एकसारख्या शंका विचारीत रहावें !

युव०:—माझी शंका अशी आहे, मीं कचाला जिवंत जाळलें—

शिष्य०:—कचाला जरी जिवंत जाळलेंत, तरी मी देवयानीशीं लग्न करणार नाहीं !—आपला आग्रहच असेल, तर आपल्यासारख्या एखाद्या जिवलगाला चोरटें सुख मिळावें म्हणून, एखाद्या कचविहीन देवयानीशींही मी लग्न करीन. आम्ही दारूबाज लग्नाचे संस्कार कुचकामाचे समजतों; ह्या चमत्कार दाखविण्याकरितांच मी लग्नाचे भानगडींत पडणार आहें !

युव०:—दारूच्या अंगीं ही शक्ति आहे, हें मला माहीत आहे. माझी शंका आहे ती निराळीच ! ही पहा कचाचे हाडांची थोडीशी राख मीं येथें बरोबर आणली आहे, आणि बाकीची राख दारूंत मिसळून आचार्यांना पाजण्याकरितां बाबा व सेनापति गेले आहेत.

शिष्य०:—बरें; गेले आहेत ! मग शंका कोठें येते ती सांगा पाहूं ?

युव०:—शंका म्हणजे अशी—हाडांची राख मिसळलेलें तें घाणेरडें पेय आचार्य कसें पितील ? आचार्य जर खरोखर प्याले, तर तो मी चमत्कारच समजेन ! असला चमत्कार खरोखर घडून येईल काय ?

शिष्य०:— मी पाहिजे तितके असले चमत्कार करून दाखवितों !

मधु०:—अगदीं बरोबर ! अगदीं असेंच ! हें काम शिष्यवरच उरकूं शकतील ! युवराज, दारूच्या पेल्यांत टाका ती कचाच्या हाडकांची पूड ! शिष्यवर एका घोटासरशीं पिण्याचा चमत्कार करून दाखवतील !

शिष्य०:— हो ! मी दाखवितों तसला चमत्कार !—हाडांची पूड या पेल्यांत कालवून पितांना दारूला नवी लज्जत आली आहे, असें जर मला

वाटलें नाहीं, तर आयुष्याचीं इतकीं वर्षें दारू न पितां पाणी पिऊन मीं वायां दवडलीं, असें समजा!—नुसतें पाणी पिऊन पशूप्रमाणें तहान भागविणारा अजागळ ब्राह्मण हा नव्हे!—टाका ती पूड या पेल्यांत, एका घोटासरशी सगळी पितों! (युवराज पूड टाकितो. पीत पीत) नवी लज्जत आली! मजा आला! मसालेदार झाली! मजा आला!

रसि०:—(स्वगत) व्यसनी श्रीमंतांजवळचे हे विद्वान् फुकटे म्हणजे मूर्तिमंत रक्तपितीच समजली पाहिजे!

शिष्य०:—मजा आला! आणखी असली तर टाका. (चाटीत) मजा आला! युवराज, मजा आला!

मधु०:—बरें केलेंस देवा, मला शिकला सवरलेला विद्वान् दारूबाज केलें नाहींस! सुवर्तनाच्या नियमांचा पाया फाजील विद्वत्तेनें ढासळला गेला नसल्यामुळें माझ्यासारखे आडमुठे, विद्वानांइतक्या तरी झुकांड्या खात नाहींत!

शिष्य०:—कां युवराज, दाखविला का नाहीं हाडांची राख पिण्याचा चमत्कार! आणखी किती चमत्कार करून दाखवूं?—विद्वानाचें जिव्हाग्रहण मदिरेनें केलें म्हणजे ती सनाथ होऊन यक्षिणीच्या कांडीप्रमाणें चमत्कार करूं लागते!—लग्नसंस्कारासंबंधानें दारूचा मोठा चमत्कार असा आहे कीं, कसलीही पतिव्रता असूं द्या, दारूची सवय लागली म्हणजे तिचें पतिप्रेम इतकें दृढ होतें कीं, पाहिजे त्या पुरुषाचे ठिकाणीं तिला पतीची प्रतिमा दिसूं लागते! खाल्ल्याघरचे वांसे मोजण्याची अट्टल चोरांची विद्या पिढीजाद सावांनाही दारू तेव्हांच शिकविते! उकिरड्यांतील पाझरांत नंदनवनांतील अमृताची चव दारू उत्पन्न करिते.

मधु०:—अगदीं बरोबर! अगदीं असेंच! हें उकिरड्यांतील अमृत सर्व विद्वान् दारूबाजांनीं आज काल पिऊन टाकल्यामुळें नरकांतले किडे तहानेनें व्याकूळ झाले आहेत!

शिष्य०:—त्या किड्यांना कितीही तहान लागली तरी आम्ही दारूचा एक थेंबही मिळूं देणार नाहीं! (पीत पीत) मजा आला! युवराज, मजा आला! मला वाटतें आपण या पेल्यांत टाकलेली हाडांची पूड कचाच्या मस्तकाच्या कवटीची असावी!—या चवीला विद्वत्तेची झाक मारते आहे,—आणि गोडीही आहे; गोड गळ्याचीं हाडें थोडींशीं मिसळलेलीं असावींत! विद्वानाच्या हाडांत मुरलेल्या खऱ्या विद्वत्तेची चव मजसारख्या विद्वानाचीच जीभ ओळखूं शकते! विद्वत्तेचा मजा कांहीं निराळाच असतो; युवराज,—

मधु०:—

पद ४७. राग भैरवी, ताल केरवा.

[ " नइ जोबनवालिका " या चालीवर. ]

कचचूर्ण चाखितां मजा आला,  
मनुज पशुसम किं झाला ॥ ध्रु० ॥  
दिसतो नर हा मर्कट लीला,  
ऐशा विरोधें मजा आला;  
न धरि शृंगा, पुच्छ न अंगा,  
नंदी असा हा; मजा आला ॥ १ ॥

[ पडद्यांत—आनंदाची बातमी! आनंदाची बातमी! युवराज कोठें आहेत? आनंदाची बातमी! आनंदाची बातमी! मसाल्याची दारू महाराजांनीं प्राशन केली! आनंद झाला! युवराज कोठें आहेत? ]

युव०:—हा मी आलोंच बाबा !—चल, रसिके, चल. बाबांना आनंदानें कडकडून भेटूं द्या. चल, मधुकरा, चल.

[ युवराज व मधुकर जातात. ]

शिष्य०:—रसिके, कचाच्या हाडांच्या मसाल्याची दारू मी प्यालों; आचार्यांनींही तसेंच केलें,—आचार्य झाले तरी माझेंच अनुकरण करितात ! आहेंच मी तसा जाडा विद्वान् ! रसिके, आतां मीं दाखविलेल्या विद्वत्तेच्या चमत्कारामुळें, मीं तुझ्याशीं लग्न केलें तरी लग्नसंस्काराची राखरांगोळी करून दारूबरोबर लग्नाच्या विधिनिषेधांना गट्ट पिऊन टाकीन, अशी युवराजांप्रमाणें तुझीही खात्री झालीना ?

रसि०:—लग्नाचा बागुलबुवा आतां मला मुळींच वाटत नाहीं.—चला लवकर; युवराजांचा जयजयकार करायला आम्हीं या वेळीं चुकतां कामा नये. ( जातात. )



## प्रवेश तिसरा.



[ एका बाजूनें अधिराज, सेनापति वगैरे, आणि दुसऱ्या बाजूनें युवराज, रसिका, शिष्यवर, मधुकर वगैरे प्रवेश करितात.]

मधुकर व सेनापतिः—

४८ श्लोक.

नमे इंद्र ज्या राजराजेश्वराला,
भयाभीत तो पाहतां हो कचाला !

तया धन्य हा पुत्र चाणाक्ष झाला,
कचा जाळुनी जो प्रकाशी कुलाला ॥ १ ॥

युव०:—बाबा, मला अगोदर सांगा, कचाचे हाडांची पूड मद्यांत टाकिली आहे, हें आचार्यांना समजलें का ? .

वृष०:—नाहीं, समजलेंच नाहीं. आजची भट्टी उत्कृष्ट साधली आहे अशी तारीफ करीत ते आकंठ प्याले !

युव०:—त्या रंगेल वृद्धाचे पोटांत ती राख सगळी गेलीना ? त्या जीर्ण कवीनें मिटक्या मारीत ती प्राशन केली ना ? मला वाटलेंच होतें, तो चळलेला थेरडा—

वृष०:—मुला, हें काय बरळतो आहेस ? शुद्धीवर आहेसना ?

युव०:—बाबा, अपराध घडूं नये घडला क्षमा करा.—गुरुदेवतेला आपण तसला नैवेद्य अर्पण केला, तो केवळ अपत्यस्नेहामुळें केला; हें मी जाणून आहें—

वृष०:—मग—

युव०:—विजयप्राप्तीच्या मदानें माझ्या हातून गुरुनिंदेचा प्रमाद घडला ! माझ्या अंगावर दारू कधींही चढत नाहीं; पण यशाची निशा चढली खरी !—पुत्रस्नेह जागृत करून हा अपराध पोटांत घाला !—तीं मसाल्याचीं दारू पीत असतांना गुरुदेवतेची मुद्रा प्रफुल्लित होती ना ?

सेना०:—आम्हीं प्रथमच युक्ति केली; नेहमींची दारू प्रारंभींच खूप पाजली. निशा चढूं लागून गुरुदेवतेचें मुखकमल योगमुद्रेपासून चोरलें गेल्यानंतर मसालेदार पेले पुढें केले ! त्यामुळें आचार्यांच्या ध्यानांतच आलें नाहीं कचाचे हाडांची राख दारूंत मिसळलेली आहे म्हणून !

शिष्य०:—पण माझ्या ध्यानांत तेव्हांच आलें, कचाचे कवटीच्या हाडांची राख कोणची? गळ्याच्या हाडांची राख कोणची? बरगड्यांची कोणची? कंबरेची कोणची? दारू पिऊन पिऊन जीभ फारच मार्मिक व्हावी लागते, तेव्हां हे सूक्ष्म भेद समजतात!

रसि०:—दारूबाजांची जीभ चवचाल तर खरीच, पण यांची बाई कमालीची चिकित्सक!

शिष्य०:—आचार्यांना ओळखूं आलें नाहीं यांत कांहीं नवल नाहीं! कारण दारूची सत्ताच तशी बलवत्तर आहे! मद्यपी खाण्यापिण्याचा विधि-निषेध मानीतच नाहींत; मदिरेच्या प्रतापानें सर्व रुचकर वाटतें.—दारूची निशा चढलेली असावी आणि मातेनें तान्हुल्याला प्रेमानें स्तनपान कर-वीत असावें; इतक्यांत जर का त्या सोनुकल्यानें आईचें मुख कुर-वाळून आपला करपल्लव मातेच्या तोंडांत घातला, तर तें कोंवळें हाडुक—हाडकाचा लवचिक तुकडा—आणि लुसलुशीत—अभिनव—मांस आईचे दांत मोठ्या स्फुर्तीनें चावल्याशिवाय कसे राहतील? इतकेंच नव्हे, तर त्या करांगुलींतून निघणाऱ्या ताज्या रक्ताचे चिरकांडीला—गरम रक्ताचे कारं-ज्याला मद्यपी आईची जीभ जळूप्रमाणें चिकटल्यावांचून राहत नाहीं; असा आहे दारूचा प्रभाव!

रसि०:—पोटाचे घेरावरोबर दारूबाजांचा खादाडपणाही एक-सारखा वाढत असतो!

शिष्य०:—खादाड म्हणजे काय पाहिजे तें आणि पाहिजे तितकें आम्ही दारूबाज खातों! पण या पठ्याची गोष्ट सामान्य दारूबाजाहून जरा निराळी आहे. पाहिजे तो पदार्थ मी खातों, पण त्यांतील चवीचे बारीकसारीकही भेद चटदिशीं माझी जीभ ओळखते! चवळीत

असलेलें हाडुक खरजुल्या मांजराचें आहे का पिसाळलेल्या कुत्र्याचें आहे, हें ओळखावें माझ्याच जिभेनें; आचार्यांची देखील ही प्रज्ञा नाहीं !

युव०:—मित्रा, दारूच्या सर्व चंचल नखऱ्यांनीं तुझी जीभ नटलेली पाहूनच कचाचें संकट टाळण्याची आजची युक्ति मला सुचली; तेव्हां तुझ्या जिभेची तारीफ करावी तेवढी थोडीच !—बाबा, मदिरेनें आपलें काम पार पाडलें; तेव्हां आतां मदिरागृहांत जाऊन मदिरेची पूजा-अर्चा करून सर्व नागरिकांना तिचा प्रसाद यथेच्छ दिला पाहिजे.—सर्व नगरांत असा मदिरोत्सव चालला असतांना त्या समारंभाला गुरुमहाराजांना बोलावूं, आणि नंदनवनांतील सर्व मोहक फुलांचा अर्क काढून त्या सुवासिक मद्याचा नैवेद्य आचार्यांना दाखवूं. म्हणजे आजच्या आमच्या जरूरीच्या पण कपटवृत्तीच्या खेळाबद्दल गुरुदेवतेचा रोष आम्हांवर होणार नाहीं.

वृष०:—मद्याचें दुष्कृत्य मद्यानेंच धुवून काढलें पाहिजे !

रसि०:—दारूनें जर मारलें तर दारूनेंच तारलें पाहिजे !

शिष्य०:—सर्व नगरांत आज असें झालें पाहिजे !

**पद ४९** राग वसंत, ताल एक्का.

[ "यँडी यँडी गौलि गौलि" या जालीवर. ]

प्रेमदान मद्यपान वर्षो अजि, वारि
जलद जेंवि, मधुनगरी; प्रीतिपात्र
घेवो मधुसि मात्र रात्र सारि ॥ धृ० ॥
लुटित रमणसुख नरगण, त्यजित गर्व
धुंद सर्व नारी; मदनविजय मधुमद धरि ॥ १ ॥

[ जातात. ]

## प्रवेश चवथा.



[ शुक्राचार्य ध्यानस्थ बसले आहेत; देवयानी जवळ उभी आहे. ]

**देव०:—**

**पद ५०.** राग मांढ, ताल दादरा.

[ "ल्हारे म्हाने लियोरे जलाल" या चालीवर. ]

घाला घाली प्रेमावरि काळ,
यम कापित कचकंठनाल ॥ ध्रु० ॥
मी वदुं कुणाला, धाव पाव
देवाधिदेवा, धावपाव ! ॥ १ ॥
देवधर्म मला काव्यनांव,
तुझा गेला, ताता, देववाळ ॥ २ ॥

आज इतक्या वेळ बाबा ध्यानस्थ कां ? कचदेवांना मारून चांडाळांनीं कोठें ठेविलें, हें बाबांच्या दिव्य दृष्टीला अजून कसें दिसलें नाहीं ?— युवराज, कचदेवांना आपण एकदां मारलेंत, बाबांनीं त्यांना जिवंत केलें, मग पुन्हा पुन्हा तोच प्रकार कां ?—त्याच त्याच मर्माचे जागीं वारंवार घाव घातल्यानें दुःखाच्या वेदना होण्याचें बाजूला राहून अन्तःकरण कठोर होतें, आणि कोमल मनाची स्त्रीजात क्रूर बनते. ज्या सांप्रदायांत मी जन्मास आलें, त्या सांप्रदायाबद्दलचा माझ्या मनांतील अभिमान नष्ट होऊन, तो सांप्रदाय संपुष्टांत आलेला पाहण्याइतका निष्ठुरपणा युवराज, तुमच्या दुष्कृत्यामुळें या वेळीं माझ्या अंगांत संचार करीत आहे !—स्त्रियांच्या शरिरांत वास करणाऱ्या कोमल हृदयांनो, माझा हा उग्र कठोरपणा पाहून अखिल स्त्रीजातीला मी बट्टा लावतें कीं

काय, अशी भीति बाळगूं नका.—हा संताप बट्टा लावणारा नसून, स्त्रियांचें दिव्य प्रेम परमेश्वरी कार्याकडे खर्च करावयास शिकविणारा हा निर्भीड काटेकोर गुरु आहे!—ऐका, नाजूक अबलांनो ऐका; सदय साध्वींनो, ऐका. विधात्यानें प्रारंभीं सुंदर, सुवासिक, व कोमल फुलें मात्र निर्माण केलीं; त्या वेळीं सृष्टींत दुसरें तिसरें कांहीं नव्हतें. पण पुढें त्या फुलांची गर्दी इतकी झाली कीं, विश्वाचे आवारांत न मावण्याइतका सौंदर्याला ऊत येऊन सौंदर्याचेच फाजीलपणापासून कुरूपता जन्मास आली; सुवासाच्या अमर्यादित भेसळींची दुर्गंधी झाली; आणि फुलांच्या पाकळ्यांनीं एकमेकांस स्वतःचे भाराखालीं निर्दयतेनें दडपल्यामुळें कठीण फत्तरांचें ओझें पृथ्वीच्या पाठीवर पडलें! स्वतःच्या सदिच्छेचा असा हा विपर्यास झालेला पाहून, चांगल्याचा परिपाक वाईटांत होऊं न देण्याची कामगिरी सांगून स्त्रियांच्या हृदयांना विधात्यानें जगांत सोडून दिलें!

पद ५१. राग वागेश्री, ताल झपताल.

[ "आतां राम पाहि मना" या चालीवर. ]

आतां राग देइ मना शांततेला;
वीर हा; असुरसंहार झाला ॥ ध्रु० ॥
कोप दुर्गेचि खरा दुर्बला जाहला,
विजयदायक मला, वंदी याला ॥ १ ॥

माझ्या बाबांचे सांप्रदायांत युवराजासारखे अधम खपले जाऊन, दैदिप्यमान् दिसणाऱ्या त्या सांप्रदायाच्याच पोटांतून काळीं कुळकुळीत नीच कृत्यें बाहेर पडूं लागल्यामुळें, त्या सांप्रदायाची शक्ति आवरण्याकरितां स्त्रीप्रेमाच्या रूपानें माझ्या हृदयांत परमेश्वर अवतीर्ण होऊन, युवराज, तुम्हांलाच केवळ नव्हे, तर तुमच्या सांप्रदायाला या वेळीं शापानें दग्ध

करीत आहे !–बाबा, बाबा, कचाच्या शवाचे तुकडे नीचांनी कोठें लपवून ठेविले याचा जर थांग लागत नसेल, तर समाधींत प्रळयकाळचा अग्नि उत्पन्न करून वृषपर्व्यांचें घराणें माझ्या डोळ्यासमोर प्रथम जाळा; आणि नंतर संजीवनी विद्येनेंही कचदेव पुन्हा सजीव होणें शक्य नाहीं, असें मला—( शुक्राचार्य समाधींतून उठतो. ) असे आपण घाबरल्यासारखे कां ?–असे कावरे बावरे कां !–असे भयाभीत कां ?–कचदेव जिवंत होणें अशक्य, हेंच ना तुम्ही मला सांगणार !–नका; इतक्यांत ते शब्द उच्चारूं नका.

शुक्र०:—घात झाला ! बाळे, घात झाला ! संजीवनी विद्येमुळें सर्व देवांना धुळीस मिळविणारा हा शुक्र स्वतः धुळीस मिळाला ! मी कवडीमोल झालों; देवयानी, मी कवडीमोल झालों !

देव०:—बाबा, माझा कच जिवंत होईल ना ?

शुक्र०:—होय मुली, तुझा कच जिवंत होईल, जिवंत झाल्यावांचून राहणार नाहीं; आणि त्याला संजीवनी विद्या मिळाल्यावांचून राहत नाहीं.–माझी इच्छा नसतांना–वृषपर्व्यांची इच्छा नसतांना–माझ्या सांप्रदायाची इच्छा नसतांना–तुझा कच विद्या हरण करणार ! आणि मी–माझी तपश्चर्या–माझा सांप्रदाय—

देव०:—मग बाबा, त्यांत काय वाईट झालें ?

शुक्रा०:—काय वाईट झालें ? तुझा बाप धुळीस मिळाला तर त्यांत काय वाईट झालें ? या शुक्राची कित्येक तपांची तपश्चर्या मातीमोल झाली तर त्यांत कांहीं वाईट नाहीं झालं !–ऐक. मुली, तुझा कच संजीवनीची चोरी करणार; तुझा कच जिवंत होऊन या शुक्राची जीर्ण हाडें जमिनीवर पसरणार; तुझा कच विजयी होऊन, देवेंद्राची सेना माझ्या

सांप्रदायाची धूळधाण करणार !—मुली, या गोष्टी माझ्या नशिबीं विधा-त्यानें लिहिलेल्या दिसतात, आणि त्या टाळतां येणें मला शक्य नाहीं.—आणि या सर्व दुःखांचा कळस म्हणजे आमच्या ह्या पराभवाचें मूळ तो तुझा कच, तुझें पाणिग्रहण करून स्वतःच्या बुद्धिवैभवाची व आमच्या बुद्धिहीनत्वाची पताका म्हणून तुला देवलोकांत फिरविणार !—सांग, मुली, सांग; तुझ्या बापाची विद्या चोरणाऱ्या त्या दरवडेखोराला,—तुझ्या बापाला यमसदनाला पाठविणाऱ्या त्या मारेकऱ्याला प्रियकर समजून तूं आपलें पाणिग्रहण करूं देशील काय ? तुझ्या पित्याच्या रक्तानें न्हाले-ल्याला तूं प्रेमालिंगन देऊं इच्छितेस काय ? बोल, देवयानी, बोल; सासऱ्याचें हृदय विदारण करणारा पुरुष बायकोचें मन रिझवूं शकतो काय ?

देव०:—पण बाबा, कचदेव चोर कसे ? दरवडेखोर कसे ? मारेकरी कसे ? हेंच मला समजत नाहीं. ते आहेत कोठें तें मला प्रथम सांगा—

शुक्र०:—बाळे, कच या वेळीं माझ्या पोटांत आहे !

देव०:—म्हणजे ?

शुक्रा०:—होय; पोटांत आहे. कचाला जाळून त्याच्या हाडांची राख दारूबरोबर मला पाजण्यांत आली आहे. या वेळीं कच माझ्या पोटांत नसून आमच्या कुळाचा संहार करणारा तो सर्पच माझ्या पोटांत आहे.

पद ५२. राग अडाणा, ताल एका.

[ " सार खरे " या चालीवर. ]

ताप खरा, कविगणनिंदक,<br>
काव्यहिंसक, रसा शाप, हा साप ॥ ध्रु० ॥<br>
हृययिं होत रण; व्यापुनि देहा<br>
विषचि विदारुण देत मला हा !

गर्भधर पुरुष, दाह दे भुजंगविष;
गरल मारी माताही बाप ॥ १ ॥

देव०:—हाय रे देवा !—बाबा, त्यांना जिवंत करतां नाहीं का हो येणार ?

शुक्रा०:—बाळे, मीं हजार वेळां "नाहीं, नाहीं, कचाला मी जिवंत करणार नाहीं. व संजीवनी विद्या देणार नाहीं; देणार नाहीं." अशी जरी प्रतिज्ञा केली तरी तो जिवंत होणार व विद्याहरण करणार ! कारण तो माझ्या पोटांत आहे, इतकेंच नव्हे तर रक्तांत मिसळला आहे; हृदयांत शिरला आहे; आणि या देहाच्या ज्या मर्मस्थानीं संजीवनी विद्या प्रादुर्भूत होते, त्या मर्मस्थानीं कच या वेळीं बसला आहे ! मुली, काय सांगू तुला ! आम्ही तपस्वी कित्येक तपें तपश्चर्या करून, मन सूक्ष्म बनवून, परमेश्वराच्या विश्वस्वरूपी पोटांत मिसळून, या विश्वाला हालविणाऱ्या त्याच्या हृदयाच्या सूत्रांत हळूच स्वत:ला गुंतवून घेऊन, त्याच्या शक्तीच्या मर्मस्थानीं हलके हलके प्रवेश करितों; तेव्हां एखादी सिद्धि आम्हांला प्राप्त होते. एखाद्या व्यक्तीसंबंधानें असो, एखाद्या जनसमूहासंबंधानें असो, किंवा परमेश्वरासंबंधानें असो; अन्नांत मिसळणें, पोटांत शिरणें, हृदय व्यापणें व मग सिद्धीची शेंडी हातांत घेणें, हाच मार्ग सर्वांना आक्रमावा लागतो. पण दुष्ट मदिरेनें चोरटें भगदाड पोखरून कचाचा मार्ग सुलभ केला ! तो एकदम सर्व पायऱ्या चढून वर गेला आहे; आतां संजीवनीची वेणी हातांत धरून देवलोकाकडे तिला त्यानें ओढून नेण्याचें मात्र बाकी राहिलें आहे !—मदिरे, हें तूं काय केलेंस ?

[ वृषपर्वा, युवराज सेनापति व नागरिक मद्याचे पेले घेऊन येतात. ]

सेना०:—

५३ श्लोक.

कचा मारुनी संकटाला निवारी,
करी बुद्धि ही उत्सवाची तयारी ।
प्रजा मद्यपी येत आमंत्रणाला;
चढो मद्य हें नायकाचे पदाला ॥ १ ॥

शुक्रा०:—काय आणिलें आहे हें ?

वृष०:—गुरुदेवतेचें माझ्यावरील प्रेम ओळखून गुरुचरणांची पूजा-अर्चा घडावी म्हणून मदिरेचा महोत्सव नागरिकांनीं सुरू केला आहे—

युव०:—आणि या महोत्सवाचे प्रसंगीं गुरुमाउलीनें दर्शन द्यावें म्हणून आमंत्रण देण्याकरितां नागरिकांना घेऊन मी आलों आहें. नागरिकांच्या या नजराण्याचा गुरुमहाराजांनीं स्वीकार करावा.

शुक्रा०:—( दारूचे पेले झिडकारून व सुरया लाथाडून ) आग लागो तुमच्या या मदिरोत्सवाला आणि दारूनें सडलेल्या तुमच्या गुरुभक्तीला !—राजा, कच माझा अनुयायी झाला नाहीं तरी, मी त्याला जामात करून कदाचित् संजीवनी विद्या देईन; या भीतीनें दारूबरोबर मला तूं कचाची राख पाजलीस !

वृष०:—( पायां पडून ) स्वजनांवरील प्रेमामुळेंच ही फाजील खबरदारी घ्यावीशी वाटली,—

शुक्रा०:—लोभी पाप्या, ही फाजील खबरदारी नव्हे, तर विवेकभ्रष्टाचा हा मूर्खपणा होय !—राजा, तूं आपण होऊन आपल्या पायावर धोंडा मारून घेतलास !—केवढा घात झाला तें मूर्खा, ऐक.—माझ्या

मर्मस्थानीं कच आहे, ही बातमी देवेंद्राला समजली म्हणजे—एव्हांना समजलीच असेल—एका क्षणांत युद्धास पुन्हा प्रारंभ होईल; आणि तुझ्या बाजूचा पडलेला पाहिला वीर जिवंत करण्याकरितां मीं संजीवनी मंत्र नुसता मनांत आणला, कीं कचाला तो मंत्र प्रथम प्राप्त होऊन त्या मृतवीराबरोबरच कचही जिवंत होऊन तुझा गुरु हा शुक्र जमिनीवर मरून पडेल ! राजा, माझ्या तपश्चर्येची नासकी कुचकी दारू झाली रे दारू झाली !

पद ५४. राग मल्हार, ताल त्रिवट.

[ " प्रेमा तो नव्हता " या चालीवर. ]

गेला रवि अस्ताला; गलितकरबल हा झाला;
निशेंत फसला हो; कळुनि वळुनि रजनिरत गेला, ॥ ध्रु० ॥
लाल तपाला धरित उदित कवि दिसला;
तप्त होती नमिति सुरहि; परि नेत विषयरति
कालकंदरीं, गेला ॥ १ ॥

युव०:—गुरुकृपेला कोणचीही सीमा नसते, म्हणून विनंति करण्याचें धाडस करितों.—मृतवीरांना सजीव करण्याकरितां यापुढें गुरुमहाराजांनीं संजीवनी मंत्र जपण्याची दगदग सोसूंच नये; म्हणजे कच जिवंत होण्याची भीतिच राहणार नाहीं.—गुरुदेवतेच्या सांप्रदायाबद्दलच्या अभिमानांत मी कोणाला केसभरही हार जाणार नाहीं, हें गुरुमहाराजांच्या प्रत्ययास आलेंच आहे. तेव्हां या लेंकराची गुरुमाउलीच्या पायापाशीं अशी विनंति आहे, मला संजीवनी विद्येचा उपदेश करून पट्टशिष्याचा बहुमान—

देव०:—वस्स कर तुझें पांडित्य !—अधमा, एक शब्दही पुढें बोलूं नको.—बाबा, संजीवनी विद्येबरोबरच देवयानीही मला द्या, असें वद-

ण्यास या चांडाळाची जीभ चुकणार नाहीं !—पाप्या, तुझ्या कृतींतलें काळें अद्याप तुझ्या पुढें उभें राहिलें नाहीं.—माझा कच जिवंत होणारच आणि त्याला संजीवनी मिळणारच !—मूर्खा, माझा कच बाबांच्या हृदयांत, आणि ज्या गाढवाला उपदेश करावयाचा तो तूं शरिराबाहेर ! जिभेनें उच्चारलेला मंत्र ओठांच्या बाहेर जाऊन तुझ्या लांब कानांत शिरण्याचे अगोदरच, माझ्या कचाला त्या मंत्राची प्राप्ति होईल. अहंकाराच्या मूर्तिमंत पिशाच्चा, ऐक. बाबांनीं कोणालाही जरी उपदेश केला नाहीं, तरी मदिरेची निशा उतरल्यावर प्रातःकालच्या शांत समयीं किंवा सायंकाळच्या शीतल वेळीं कवींतले कवि माझे बाबा योगस्थितींत सहजगत्या जातील; आणि त्या वेळच्या त्यांच्या पवित्र हृदयांत संजीवनी विद्या आपोआप उदय पावेल. कवीचें हृदय सर्व विद्यांचें क्रीडाभुवन असतें. विद्याव्यासंगाच्या निर्मल आनंदाचे वेळीं बाबांच्या हृदयांतील माझ्या कचाला संजीवनी विद्या मिळालीच पाहिजे.—चांडाळा, संजीवनी विद्येच्या लोभानें तूं माझ्या प्रेमावर दोन वेळां रखरखीत निखारे ठेविलेस, आणि आतां निर्लज्जपणानें बाबांच्याजवळ विद्येची सिद्धि मागायला आलास नव्हे ? गुरूनें तुला विद्या देण्याचे ऐवजीं गुरूकन्येचा हा शाप घे; स्त्रीसुख तुला कधींही मिळणार नाहीं, कोणच्याही विद्येचें तुला दर्शन होणार नाहीं; आणि लक्ष्मीच्या उपभोगाकरितां हपापलेंलें तुझें मन दारिद्र्याच्या नरकांत अक्षय्य पडून राहील !

पद ५५. राग अडाणा, ताल त्रिवट.

[ " तदेरना देरना देरना " या चालीवर. ]

विघोर लोभमूल पापकूप हा, या डोहीं हे विहरति
खल अधम निज-सहज-सदनसम सकल पतित पहा ॥ध्रु०॥
मुकुलमृदुलजन-हनन बहुसुखद विलसन मानि,
तूं अवनति, तूं नरक भयद महा ॥ १ ॥

वृष०:—गुरुकन्ये, शांत हो ! शांत हो. सांप्रदायिकांच्या चुकीची क्षमा करून आमचे मूर्खपणाकडे सदय दृष्टीनें गुरुजनांनीं पहावयाचें नाहीं, तर कोणीं पहावयाचें ?

शुक्रा०:—राजा, सदय दृष्टीचा आतां कोणचा उपयोग उरला आहे ? अरे, या शुक्राचा अवतार तुम्ही संपुष्टांत आणला रे संपुष्टांत आणलात ! राजा, देवयानीनें आतां सांगितलें तें खोटें नाहीं. माझ्या शरिरावरच्या मद्याचा किंवा क्रोधाचा अंमल थोडासा कमी होऊं दे, संजीवनी विद्या माझ्या हृदयांत स्फुरण पावलीच म्हणून समज ! मग कच जिवंत होऊन विद्या घेऊन देवलोकीं जाणार व मी भूलोकीं मरून पडणार ! कचानें गुरुदक्षणा म्हणून मला जिवंत केलें तर केलें ! राजा, मी प्रहरा दोन प्रहराचाच आतां सोबती आहे, असें समज. कचानें विद्याहरण करण्याचा प्रश्न एका बाजूलाच राहूं दे, पण प्रहरा दोन प्रहरानें सजीव व विद्यासंपन्न झालेल्या आमच्या शत्रूचीं माझ्या कन्येनें आर्जवें करून, तुझ्या सांप्रदायाचा नेता सजीव करण्याची भीक मागण्याचा दुःसह अपमान भोगण्याचें आपल्या सांप्रदायाचे नशिबीं येणार, हें मला स्पष्ट दिसतें आहे.—राजा, सांप्रदायाचा अभिमान ज्या वेळीं माझ्या अंगांत संचारतो, त्या वेळीं वाटतें, एक वेळ दारू पीत पीत मूढस्थितींत देहत्याग करून पशूंच्या जन्मास गेलेलें पत्करलें, पण प्रतिस्पर्ध्यांचा डाव साधलेला डोळ्यांनीं पहाणें नको !

देव०:—अधिराज, युवराजाच्या मूर्खपणाला फळें किती कडू आलीं आहेत, हें आतां तुमच्या ध्यानांत आलेंच असेल ! सांप्रदायावरील प्रेमापुढें बाबांना माझी किंमत नाहीं, स्वतःच्या आत्म्याच्या अधःपाताची पर्वा नाहीं, हें आपण जाणतच आहां. हट्टाला पेटून आम्हां सर्वांचा क्षय झालेला पाहणें बाबा कदाचित् पत्करतील; पण देवगुरूचें वर्चस्व कबूल करणार नाहींत.—साध्वींच्या संसारसुखाच्या लालचीनें मी बोलतें आहें, असें

समजा; किंवा कचदेवावरील माझ्या प्रेमामुळें मी बोलतें आहें, असें माना; किंवा दोनही पक्ष हट्टाला पेटले असतांना विवेकी परमेश्वरी वाणी ज्या कुमारीच्या हृदयांत प्रगट होऊन प्रेमरूपानें सत्पक्षावर न्यायीपणाचा शिक्का मारते, ती कुमारी न्याय देत आहे असें म्हणा;—परमेश्वरी सत्तेचा कल कचदेवाचे बाजूचा आहे, हें तुम्हीं नाकबूल करण्यांत आतां अर्थ नाहीं! अधिराज, बाबांच्या शिष्यवृंदाचे मुख्य या नात्यानें आपणच बाबांना विनंति केली पाहिजे, सहज स्फूर्तीनें कचदेवांना विद्येची प्राप्ति होण्यापेक्षां स्वतः आपण होऊन संजीवनी विद्या हुंडा म्हणून जामातस्वरूपी कच-देवांना देण्यांत सांप्रदायाचा बराचसा बचाव होणारा आहे.

वृष०:—गुरुकन्ये, तुझें म्हणणें बरोबर आहे.—आचार्य, आमचे मूर्खपणाकडे सदय दृष्टीनें जर पहावयाचें असेल, तर देवयानी व संजीवनी विद्या कचदेवाला देण्याचा संकल्प करून, संजीवनी विद्येचा मंत्र गुरुदेवतेनें जपावा. असे नाहीं तसें, आमच्या सांप्रदायाचें वर्चस्व कमी होणारच; मग नव्या स्थितींतील नव्या तपश्चर्येच्या वेळीं या गुरुचरणांना तरी आम्हीं कां अंतरावें?

शुक्रा०:—राजा, काय तुझी आणि माझी स्थिति झाली ही! तुझा अविचार आणि माझी दारू, या दोघांचा संयोग होतांच माझ्या सांप्र-दायाला कचापुढें नाकें घासण्याचा प्रसंग आला! अधिराज, संजीवनी विद्या ज्याचेजवळ, त्यांच या शुक्रावर शत्रूकडून जिवंत होण्याची पाळी यावी हं!—अधिराज, तुम्हीं किंवा देवयानीनें विवेकाच्या कितीही गोष्टी सांगितल्यात, तरी त्या मला या वेळीं पटत नाहींत. नाहीं हो, मला ही दुःस्थिति सोसवत नाहीं!—शुक्रा, दारूच्या दुष्ट व्यसनानें काय तुझी दीन स्थिति केली ही!—हंसा, सर्व विद्यांनो, या मद्यपी शुक्राला हंसा! थुंका,

सर्व तपस्व्यांनो, या मद्यपी शुक्राचे तोंडावर थुंका ! धिक्कारा, ब्रह्मयज्ञ करणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांनो, या मद्यपी शुक्राला धिक्कारा ! आणि अखिल दुनियेंत द्वाही फिरवा कीं दारूमुळें बुद्धिनाश होतो, दारूमुळें शत्रूला पोटांत शिरायला मिळतें, दारूमुळें शत्रूला हृदयांत दबा धरून बसावयाला मिळतें, आणि दारूमुळें सर्व विद्या शत्रूच्या ताब्यांत जाऊन शत्रूच्या ओंजळीनें पाणी पिण्याची पाळी येते ! कार्यकर्ते तपस्वी हो, या शुक्राच्या अधःपाताचें उदाहरण नेहमीं डोळ्यापुढें ठेवून, कोणत्याही मोठ्या कार्याचा नेतेपणा किंवा कारभार व्यसनी पुरुषाकडे ठेवूं नका.—राजा, माझ्या आत्मयज्ञाची छीथू होऊन सर्वस्वाचा घात या दारूमुळें होत आहे ! राजा, हा व्यसनी व विवेकभ्रष्ट शुक्र पुनः तपस्वी होऊन तुझ्या सांप्रदायाचें कल्याण व्हावें अशी जर तुझी इच्छा असेल, तर माझ्या डोळ्यासमोर दारू कधींही येणार नाहीं अशी व्यवस्था कर; इतकेंच नव्हे, तर तुझ्या सांप्रदायांतून त्या कुलटेला—दारूला—हांकून लाव !—नागरिक हो, ज्या मदिरेनें या तेजस्वी शुक्राच्या तोंडाला काळें फासलें, त्या मदिरेचा उत्सव एकदम बंद करा ! राजा, दारूचे व्यसनाला भयंकर पातक समजून रक्तपितीप्रमाणें दारूलाही शिष्टसमुहांतून तूं सक्तीनें हद्दपार केल्याशिवाय, या शुक्राचे अंगीं पुनः तपश्चर्या करण्याचें सामर्थ्य येणार नाहीं ! जो कोणी विद्याभ्यासंगी—मग तो तुझा गुरू हा प्रत्यक्ष शुक्र असो—जो कोणी विद्याभ्यासंगी दारू पितांना सांपडेल, त्याच्या घशांत तापलेल्या शिशाचा रस ओतण्यास चुकूं नकोस !

पद ५६. राग हिंडोल, ताल त्रिवट.

[ " सासा गग मम धध " या सूरावर्तीचे चालीवर. ]

करि अजि नृपवर नियम,
मारि रे अयरसें प्राशन मधुसि जरि करि
जगीं ब्राह्मण जसा मात्रागम ॥ ध्रु० ॥



[ पृ० १०६.

शुक्रा०:—ब्रह्मयज्ञ करणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांनो, या मद्यपी शुक्राला धिक्कारा ?

कारण कवि जरि जया, नच धरिं दया,
दिसत मधुरत प्राण हा हरी रे मम ॥ १ ॥

माझ्या या आज्ञेचा अंमल चोहोंकडे करून दारुड्यांचा बींमोड झाल्यावर, राजा, माझ्या दर्शनाला ये; म्हणजे कचाचे विद्याहरणानंतरही हा तपस्वी शुक्र तुला विजयाचा मार्ग पुनः दाखवील.—जा, दारुड्यांचा बींमोड करण्याचे उद्योगाला लागा, जा.

[ वृषपर्वा, युवराज, सेनापति व नागरिक जातात. ]

देवयानी, आत्मघातकी दारुडा, सांप्रदायाला संकटांत टाकणारा दारुडा, वैऱ्यांना आनंदित करणारा दारुडा म्हणून माझा दुर्लौकिक अनंत काळ होणार ! ही अपकीर्ति मी कशी टाळूं ?

देव०:—बाबा, दुर्व्यसनानें झालेली अपकीर्ति सुवर्तनाच्या तपश्चर्येनें टाळतां येते.—कचदेवांना सजीव करण्याचा व त्यांनाच संजीवनीचा उपदेश करण्याचा संकल्प करून संजीवनी मंत्र जपा, म्हणजे आपले जामात कचदेव गुरुदक्षणा म्हणून आपणांस सजीव करतील; आणि कचदेवांबरोबर मी सासरीं गेल्यावर स्वतःच्या सुनेकडे पाहून, आणि आपलें व त्यांचें जुळलेलें व्याहीपणाचें नातें ध्यानांत आणून, माझे श्वशुर देवगुरु बृहस्पती सुरासुरांमधील सांप्रतचें युद्ध बंद पाडण्यास देवेंद्राला सल्ला देतील.

शुक्रा०:—मुलगी देऊन देवेंद्राची मैत्री विकत घेऊं काय? कच खुशाल विद्याहरण करूं दे; देवयानी, तूं सुखी व्हावेंस असें मला कितीही वाटत असलें तरी, अपमानाच्या दुःखांत मी बुडालों असतांना—देवयानी, तुला लग्नसोहळ्याची सुखें कशीं आठवतात ? माझा शिष्यवृंद पराभूत झाल्यामुळें हताश होऊन मीं तपश्चर्येला बसावें, आणि शत्रूच्या मंडळांत जाऊन कचाबरोबर तूं सुखविलास उपभोगावेत, हें, देवयानी, तुला सुचलें

तरी कसें ? आम्ही वैभवाचे शिखरावर असतांना, विजयाच्या चवऱ्या आमच्या शिरांवर वारल्या जात असतांना,संजीवनीचें क्रीडाभुवन माझें एकट्याचेंच हृदय असतांना, देवयानी, प्रेमाची अल्लड गति केव्हां केव्हां अनिवार्य असतें हें ध्यानीं आणून मीं तुला कचाला दिली असती; पण माझें दुर्व्यसन—ही दारू माझेंच तेवढें सुख हरण करून राहिली नाहीं; मुलाबाळांच्या, नातवापणतवांच्या, सर्वांच्या सुखाचा नाश या दारूनें केला. —देवयानी, सांग, मला अगोदर सांग, कच जिवंत झाल्यावर माझ्या संमतीशिवाय त्याचा हात धरून जर तूं देवलोकीं जाणार असशील तर तसें मला आतांच सांग !—तुझ्या सुखसोहळ्याच्या हकिगतीबरोबरच माझ्या सांप्रतच्या अधःपाताची आठवण क्षणोक्षणीं होऊन, नव्या तपश्चर्येला मी नालायख होण्यापेक्षां, कचाला जिवंत न करतां मदिरेच्या गुंगींतच मी मरून जडसृष्टींत एखादा पाषाण होणें मला अधिक बरें वाटतें !

[ सचिंत पडतो. ]

देव०:—बाबा, आपण दुःखीकष्टी व्हावेत, असें वर्तन माझ्या हातून कसें होईल ? शिवाय कचदेवांवरील प्रेमामुळेंच मी म्हणतें, त्यांच्या सहवासाच्या सुखाला मी अन्तरलें तर हरकत नाहीं, पण त्यांचा तसा अंत व आपला असा अंत माझ्याच्यानें कसा पहावेल ? बाबा, सांप्रदायावरील गुरूचें प्रेम थोडेंसें तरी अहंकाराला चिकटून असतें; पण साध्वीच्या हृदयांतील पतिप्रेम इतकें उज्वल असतें कीं, अहंकाराचा हिणकस त्यांत किंचित्‌ही सांपडायचा नाहीं ! त्या निर्मल प्रेमाची शपथ घेऊन मी वचन देतें, कचदेव जिवंत झाल्यावर—

शुक्रा०:—तूं काय करशील ? —सांग, तूं काय करशील ?

देव०:— मी त्यांना माझ्या धाकट्या भावाप्रमाणें समजेन !

शुक्रा०:—शाबास, देवयानी, शाबास. तूं या तपस्वी शुक्राची मुलगी आहेस खरी ! देवयानी, तुझ्या आतांच्या वचनानें माझ्या रक्तांत नव्या तपश्चर्येची धमक उत्पन्न झाली आहे ! मुली, पार्वतीपरमेश्वराला स्मरून आतांच्या वचनाचा उच्चार कर, म्हणजे तुझा धाकटा भाऊ कच माझ्या संजीवनी मंत्रानें तुझ्यापुढें उभा राहील ! [ ध्यानस्थ राहतो. ]

देव०:—हे पार्वतीमाई, तुझ्या प्रसादानें कचदेव जिवंत होण्याबरोबर मी त्यांना विनंति करीन—

पद ५७. राग भैरवी, ताल त्रिवट.

[ " धन्य जाहला, माझा राम पाहिला " या चालीवर. ]

लग्न होइना, नाथा, तात साहिना ॥ ध्रु० ॥
सुखर, माना सहोदर या जना;
त्यागचि तारक, कांता, विरहि मनांना ॥ १ ॥

जगदंबे, बाबांच्या आज्ञेप्रमाणें माझ्या प्रतिज्ञेचा उच्चार मी तुला स्मरून केला आहे; तुझ्या प्रसादानें माझ्या बाबांची संजीवनी विद्या कचदेवांना आतां जिवंत करूं दे.

[ कच शुक्राचे पोटांतून बाहेर येतो. ]

कच:—आक्का !—आक्का !

देव०:—कोण मला आक्का म्हणून हाक मारीत आहे ? कोण ? कचदेव ! मला वाटलें होतें आपण बाबांना चार गोष्टी समजावून सांगून मला वचनमुक्त कराल—

कच:—आक्का, तसं करणें कल्याणप्रद नाहीं.

देव०:—तुम्हां पुरुषांचीं हृदयें कार्यानिष्ठुर सहज होतात; आम्हां बायकांना प्रेमाच्या जीवाशिवाय कार्याचा जीव माहीतच नसतो.—

नाहीं हो, माझ्या कानांना, आक्का हा शब्द ऐकवतच नाहीं ! कचदेवा, पूर्वी जसे आपण मला हाक मारीत होता, तशी हांक—

कचः—आक्का, ते आपले दिवस निघून गेले.—आतां त्यांची आठवण कशाला ? आक्का, गर्भावस्थेप्रमाणें बाबांच्या हृदयांत असतांना मीं तुझीं व बाबांचीं झालेलीं भाषणें ऐकिलीं आहेत; तेव्हां यापुढें मी तुला थोरली बहीण समजणें उचित आहे. आक्का—आक्का—

देव०:—नका नका, आक्का हा शब्द तरी वारंवार उच्चारूं नका !

कचः—आक्का, बाबांना संजीवनी विद्येच्या प्रभावानें जिवंत करून त्यांचा आशीर्वाद घेऊन मला याच क्षणीं देवलोकाला गेलें पाहिजे; कारण, तुझ्या डोळ्यांतील ते दुःखाश्रु मला कार्यविन्मुख करतील, असा संभव आहे !

देव०:—माझ्या डोळ्यांतील दुःखाश्रूंनीं भिजलेल्या मार्गानें देवलोकाला गेल्यावर जेव्हां जेव्हां आपण संजीवनी मंत्र जपाल, तेव्हां तेव्हां माझ्या निराशेची आठवण होऊन आपला कंठ दाटून येईल; व मंत्राचा उच्चारही होणार नाहीं. म्हणून म्हणतें, एकवार पूर्वीप्रमाणें मजकडे प्रेमाच्या दृष्टीनें पहा, हे दुःखाश्रु मागें परतून घ्या, आणि मग बाबांना जिवंत करा.

कचः—संजीवनी जपतांना तुझी आठवण होऊन मला गहिंवरून आल्यावांचून कसें राहील ? म्हणून देवलोकीं गेल्यावर मंत्रोपदेश दुसऱ्याला करून, या दुःखद प्रसंगाची आठवणच न होईल अशा—ज्ञानार्जनाच्या रसवर्ज मार्गाला स्वतःला वाहून घेण्याचा मीं निश्चय केला आहे.—आक्का, बाबा कोठें आहेत ते मला दाखीव; मला पुढील मार्गाला लागूं दे. सांग, आक्का, सांग—

देव०:—आक्का !—आक्का !—कठोरा, तुझा आणि माझा पिता या ठिकाणीं तुझ्या पुनर्जन्मामुळें मृत होऊन पडला आहे पहा !



कचः—बाबा, देवयानीचा धाकटा भाऊ हा कच विद्यासंपन्न होऊन देवलोकीं जावयास निघाला आहे! [ पृ० १११.

कचः—( शुक्राचे पायांवर मस्तक ठेवून )

पद ५८. राग झिंजोटी, ताल गजल.

[ " अष्टमीचा चंद्र शोभे " या चालीवर. ]

शुक्रतारा उदय पावो देवयानीचा हिरा;
गुरुसुतानें तिजसि दिधला, अलंकारचि हा खरा ॥ ध्रु० ॥
सांप्रदायी जनक दे ना सुतारत्न जरी परा,
साक्ष देई लग्नयोगा हा निशापतिसोयरा ॥ १ ॥

[ शुक्राचार्य सजीव होतो. ]

कचः—देवलोकीं जावयास निघालेल्या या पट्टशिष्याला गुरुमाउलीनें आशीर्वाद द्यावा.

शुक्रा०:—मला अभिवादन कोण करीत आहे ?

कचः—देवेंद्राचा अनुयायी—

शुक्रा०:—शत्रूला मी आशीर्वाद देत नसतों.

कचः—बृहस्पतीचा मुलगा—

शुक्रा०:—प्रतिस्पर्ध्यांचा विजय माझी जीभ उच्चारीत नसते.

कचः—शुक्रगुरूचा शिष्य—

शुक्रा०:—जबरदस्तीचे पोटीं प्रेम नसते.—नाइलाजानें ज्याला विद्याहरण करूं दिलें, त्याच्या विषयीं प्रेम कोठून असणार ?—मला अभिवादन करून देवलोकीं जातांना माझा आशीर्वाद मागण्यास तुला हक्क कसा पोंचतो ? सांग, देवयानी, मला अभिवादन कोण करीत आहे ?

देव०:—बाबा, माझा धाकटा भाऊ कच.

कचः—बाबा, देवयानीचा धाकटा भाऊ हा कच विद्यासंपन्न होऊन देवलोकीं जावयास निघाला आहे.—पितृचरणीं मीं मस्तक ठेविलें असून पित्याच्या व गुरुच्या आशीर्वादाची भीक मी मागत आहें.

शुक्रा०:—मुला, तूं विद्यासंपन्न होऊन विजयी हो ! तुझें धीरोदात्त चरित्र जे जे विद्यार्थी डोळ्यापुढें ठेवतील, ते ते विद्यादेवीच्या गळ्यांतले ताईत होऊन तुझ्याप्रमाणें स्वकीयांचा उद्धार करतील, असा तुला माझा आशीर्वाद आहे !

[ आकाशांत देव प्रगट होऊन कचावर पुष्पवृष्टि करितात. ]

शुक्राचार्य व देवः—( मिळून )

पद ५९. राग भैरवी, ताल त्रिवट.

[ "सा ध प ध" या सुरावतीचे चालीवर. ]

ती आत्मानंदा रसपररत शारदा,
देव-धेय-धाम वरो तापासि हा गुरुसुत सदा ॥ ध्रु० ॥
महाधेय सौख्यदा, सेवा संसारातीता सुरगुरुपदा,
मोहाधीना सुरामदमंद असुरगणा मानाहो आपदा ॥ १ ॥



# खाडिलकरांचीं नाटकें.

## संगीत स्वयंवर.

' श्रीरुक्मिणी-स्वयंवरा ' वरील या नाटकांत वि[illegible] यांचे ग्रन्थकारांचे विचार-त्यांच्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें [illegible] व गंभीर दोन्ही रीतींनीं ग्रथित केले आहेत; आणि ' मानापमान व [illegible]ाहरण ' या नाटकांप्रमाणेंच गायकी चालींनीं हेंही नाटक सजविलें आहे. लवकरच तयार होईल.

### संगीतमाला.

**मानापमान**—बालगंधर्व आदिकरून प्रसिद्ध नटांच्या त्या त्या भूमिकांच्या फोटोचे चित्रांसह व पदांच्या नोटेशनसह किंमत १ रुपया.

**विद्याहरण**—गंधर्व नाटक मंडळीं-तील नटांच्या त्या त्या भूमिकांच्या फोटोचे चित्रांसह किंमत ०।१२ आणे.

**स्वयंवर**—श्रीरुक्मिणीस्वयंवराचें हें नाटक लवकरच तयार होईल.

विद्याहरण नाटकांतील पदांचें नोटेशन ( रा. टेंबे यांनीं केलेलें ) स्वतंत्र पुस्त-काचे रूपानें प्रसिद्ध होईल.

### गद्यमाला.

**कांचनगडचो मोहना** किं. १२ आणे.

**सवाईमाधवराव—**

**यांचा मृत्यु.** किं. १२ आणे.

**बायकांचें बंड.** किं. १२ आणे.

**भाऊबंदकी.** किं. १२ आणे.

**प्रेमध्वज.** किं. १२ आणे.

**सत्त्वपरीक्षा**—' हरिश्चंद्रा ' चे कथानकासंबंधाचें हें नाटक लवकरच तयार होईल.

गद्य नाटकें सचित्र छापलीं असून ' महाराष्ट्र नाटक मंडळीं ' तील नटांच्या त्या त्या भूमिकेच्या फोटोंवरून चित्रें तयार केलेलीं आहेत.

**पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें:**—चित्रशाळा दुकान-मुंबई, महाराष्ट्र नाटक मंडळी, गंधर्व नाटक मंडळी व चित्रशाळा, पुणें.

मॅनेजर—चित्रशाळा प्रेस, पुणें.